# केकादर्श.

मयूरकविकृत केकावलीची

## टीका

### परशुरामपंत गोडबोले

यांनीं केली

तिची मालकी व सर्व अधिकार विकत घेऊन

ती 

मुंबईंत 

इंदुप्रकाशाच्या मालकांनी आपल्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केली.

आवृत्ति तिसरी.



शके १८०४.

सन १८८२.

किंमत १ रुपया.

## ॥ श्रीगणेशाय नमः ॥

### आर्या.

नमिला शंकर ज्याचें नामाचि संसारसागरीं सुतरी ।
स्मरतां सकृदपि येउनि निजभक्तजनांस पार जें उतरी १
नमिला शिवसुत ज्याची करि अनुकंपा जडासही सुकवी ।
चुकवी विघ्नशतातें त्याच्या संसारसागरा सुकवी ॥ २ ॥

### श्लोक.

ज्याचा राम पिता प्रसिद्ध जननी लक्ष्मी जयाची बरी
आख्या होय कुळा पराडकर ही प्रख्यात लोकीं खरी ।
ज्याला आश्रय पांडुरंग पहिला वास्तव्य बारामती
नामें पंडित तो मयूर विलसे आर्यांत ज्याची मती ॥ ३ ॥
श्रीमद्राघवरामभक्तसुकविश्रीमन्मयूरेश्वरें
केली राम वळो दयाब्द ह्मणुनी केकावली सुस्वरें ।
वाटे ग्रंथ जनांस नीरस तसा दुर्बोधसा हा परी
आहे गोड सुबोध सुज्ञ रसिकां त्या इक्षुदंडापरी ॥ ४ ॥

### आर्या.

ग्रंथ प्राकृत दिसतो ह्मणुनि प्राकृत ह्मणेल जरि कोणी ।
टाकावेंचि रसज्ञें न दिसे घृत आंत ह्मणुनियां लोणी ॥ ५ ॥

### श्लोक.

केका हीरकलाचि होत सकला माला तयांची भली
मोरानें धरिली मुखांत वरिली गंगा तशी शोभली ।
हा आदर्श लहनसाचि करितों तद्रूप जाणावया
केकारत्नपरीक्षकांसि नयनीं होईल लावावया ॥ ६ ॥

या महाराष्ट्र देशामध्यें मराठी भाषेंत कविता करणारे जे प्रसिद्ध कवि झाले त्यांजमध्यें शेवटला कवि मोरोपंत होय. याची कविता फार प्रौढ आणि सुरस असून ही संस्कृत कवितेच्या बरोबरीची ह्मणण्यास चिंता नाहीं. या कवीनें बहुतेक पुराणांवर आर्याबद्ध कविता फार सुरस केली आहे ती लोकांत प्रसिद्ध आहेच.

हा मोरोपंत महाकवि असून भगवद्भक्तही होता. त्यांत विशेषेंकरून रामभक्त होता. तो या जन्मीं आणि जन्मांतरीं घडलेलें जें दुष्कृत त्याचा निरास होऊन भगवत्प्रसाद व्हावा आणि तदनुषंगेंकरून लोकोपकारही व्हावा या हेतूनें भगवंतास संमुख करून एकशें एकवीस श्लोकांनीं स्तवितो.

पूर्वीं श्रीव्यासानें भारतादि इतिहास व पुराण ग्रंथ करून शेवटीं केवळ भगवत्प्रीत्यर्थ जसा श्रीमद्भागवत ग्रंथ केला, तसा या कवीनें भारत, भागवत, रामायणादि ग्रंथांवर टीकारूप आर्याछंदानें ग्रंथ करून शेवटीं केवळ भगवत्प्रीत्यर्थ हा केकावलीनामक ग्रंथ केला आहे.

या ग्रंथास केकावलि हें नाम देण्याचें कारण हेंच दिसतें कीं, मयूराचे वाणीस केका असें ह्मणतात. या कवीचें नांव मयूर आहे, तेव्हां त्याच्या वाणीस केका हें नांव शोभावयाजोगें आहे. प्रत्येक श्लोकास केका हें नाम देऊन त्यांची आवलि ह्मणजे पंक्ति, ह्मणून केकावलि हें नांव ग्रंथास ठेविलें आहे. त्या केका ह्मणजे श्लोक १२१ आहेत.

हा ग्रंथ जरी प्राकृत भाषेंत केला आहे तरी कवीनें यांत संस्कृत शब्द फार घातले आहेत आणि कोठें

संक्षेपानें, कोठें संकेतानें आणि कोठें अन्योक्तीनें वर्णन केलें आहे. यामुळें याचा भावार्थ प्राकृत जनांच्या तर काय, पण पंडितजनांच्याही मनांत विचार केल्याशिवाय लवकर यावयाचा नाहीं. तो सर्वांस सुगम व्हावा या हेतूनें मी परशुराम या ग्रंथावर टीका लिहावयास आरंभ करतों. ही टीका ईश्वरकृपेनें शेवटास जाओ, आणि लोकांच्या कामीं पडो, अशी परमेश्वरास प्रार्थना आहे. या टीकेचें नांव केकादर्श असें म्यां ठेविलें आहे.

कवीचें त्द्गत तर समजणें कठीणच आहे, तथापि ईश्वरानें दिलेल्या बुद्धीच्या बळानें आणि विद्वज्जनांच्या साह्यानें जितका अर्थ उघड करवेल तितका थोडक्यांत करावा अशी वांछा धरिली आहे. इतकें असून जर कोठें काठिण्य किंवा दोष राहतील तर त्यांची क्षमा सज्जनांनीं करावी.

या ग्रंथाचे सर्व श्लोक पृथ्वीछंदाचे केलेले आहेत. पृथ्वीछंदाचें लक्षण वृत्तदर्पणांत लिहिलें आहे तें असें.—

" सुवृत्त बहु चांगलें ह्मणति सुज्ञ पृथ्वी तया
अर्धीं ज स ज त्यापुढें स य ल गाहि येती जया ।
पदांत सतरा पहा असति अक्षरें मोजुनी
पदा शरण येति ते तरति कीर्ति ऐशी जुनी ॥ "

हा मोरोपंत कवि जरी रामोपासक होता तरी हें स्तोत्र त्यानें केवळ रामचंद्रासच उद्देशून केलें असें नाहीं. तर राम, कृष्ण, शिव, विष्णु आणि विष्णूचे इतर अवतार हे सर्व एकच आहेत असा भाव धरून हें स्तोत्र केलें आहे. या स्तोत्रांत कवीनें स्वोद्धाराविषयीं

ईश्वराची प्रार्थना केली आहे. आपणाकडे अतिदीनत्व घेऊन ईश्वराचे भक्तवत्सलता, दयालुता, वदान्यता, इत्यादि गुण विशेषेंकरून वर्णिले आहेत, आणि ईश्वर आपला पिता, आपण त्याचीं लेंकरें अशा भावानें लडिवाळपणाचें भाषण जागजागीं केलें आहे.

कोणताही ग्रंथ आरंभिला असतां तो निर्विघ्नपणानें शेवटास जावा ह्मणून प्रथम मंगल करण्याचा शिष्टसंप्रदाय आहे, त्या शिष्टाचारास अनुसरून कवीनें पहिला श्लोक देवतानमस्कारात्मक मंगलसूचक केला आहे. तो हा.—

---

# केकादर्श.

सदाश्रितपदा सदाशिवमनोवि-
नोदारुपदा, स्वदासवशमानसा
कलिमलांतका कामदा । वदा-
न्यजनसद्गुरो प्रशमितामितास-
न्मदा, गदारिदरनंदकांबुजध-
रा नमस्ते सदा ॥ १ ॥

या श्लोकांत अमुक देवतेस नमस्कार असें स्पष्ट जरी नाहीं तरी जीं विशेषणात्मक संबोधनें आहेत त्यांच्या अर्थावरून विष्णुदेवतेस नमस्कार आहे असें सिद्ध होतें. पूर्वीं जरी लक्ष्यज्ञान झालें नाहीं तरी लक्षणज्ञानावरून लक्ष्यज्ञान होत असतें. या श्लोकांत कवीनें जीं आठ संबोधनें दिलीं आहेत त्यांचा इतरत्र असंभव आहे, ह्मणून नमस्कार्य देवता विष्णुच होय. विशेषणात्मक संबोधनांनीं गम्यमान जो विष्णु त्याचें विशेष्यात्मक संबोधन "हे भगवन्", असें योजावें हें युक्त आहे; ह्मणून हे भगवन् नमस्ते सदा, अशी योजना करावी. हे भगवन् ! हे विष्णो ! ते—तुला, सदा—सर्वकाल, नमः,—माझा नमस्कार असो. येथें माझा आणि असो या दोन पदांचा अध्याहार केला पाहिजे.

तूं कसा आहेस, हे सदाश्रितपदा. सत् ह्मणजे सात्त्विक भक्त त्यांनीं स्वकल्याणार्थ आश्रित ह्म० आश्रयिलें असें पद–पाऊल ज्याचें अशा. कल्याणांचा दाता तूंच आहेस ह्मणून मीही तुझ्या पदाचा आश्रय करितों असा भाव. आणखी कसा, हे सदाशिवमनोविनोदास्पदा. महादेवाच्या अंतःकरणाचें विनोदास्पद ह्म० क्रीडास्थान अशा. आत्माराम असाही महादेव स्वचित्तरंजनार्थ तुझें निरंतर चिंतन करतो; मग आह्मी जीवांनीं तुझें चिंतन कसें न करावें असा भाव. आणखी कसा, हे स्वदासवशमानसा. स्वदास–स्वभक्त त्यांच्या वश–स्वाधीन आहे मन ज्याचें अशा. शिवानेंही तुझें चिंतन करावें एवढी जरी तुझी योग्यता आहे तरी तूं भक्तांला वश आहेस असा भाव. आणखी कसा, हे कलिमलांतका. कलिकालसंबंधानें लागणारा जो मल–पाप त्याचा अंतक–नाशकर्ता अशा. या कलियुगामध्यें विष्णुनामाच्या कीर्त्तनानें सर्व पातकें लयास जातात, ह्मणून आह्मी तुझ्या नामाचा आश्रय करावा हें योग्य, असा भाव. आणखी कसा, हे कामदा. भक्तांचे काम–मनोरथ पुरविणारा अशा. माझा मनोरथ पूर्ण करण्यास तूं समर्थ आहेसच असा भाव. आणखी कसा, हे वदान्यजनसद्गुरो. वदान्य ह्म० दाते जे जन त्यांचा सद्गुरु; अर्थात् मोठा दाता अशा. इतर दात्यांच्या आंगीं जें दातृत्व आहे तें तुझ्याच अनुग्रहानें आहे असा भाव. आणखी कसा, हे प्रशमिताऽमितासन्मदा. अमित–असंख्य जे असत्–दुष्ट त्यांचा मद–गर्व तो ज्यानें प्रशमित केला ह्म० नष्ट केला; अर्थात्

दुष्टांचा संहार करणारा अशा. आमच्या षड्रिपूंचा त्वां नाश करावा असा भाव. आणखी कसा, हे गदाऽरिदरनंदकांबुजधरा. गदा—कौमोदकी नामक गदा, अरि-सुदर्शननामक चक्र, दर—पांचजन्यनामक शंख, नंदक—या नांवाचा खड्ग, आणि अंबुज—लीलार्थ घ्यावयाचें कमलपुष्प यांचें धारण करणारा अशा. हीं आयुधें हातीं असल्यावर शत्रूचा नाश करणें सहज आहे असा भाव. विष्णूचे हात चार आणि आयुधें वर्णिलीं पांच, ह्मणून खड्ग कमरेस योजावा. किंवा खड्ग, गदा, चक्र, धनुष्य हीं आयुधें पर्यायेंकरून त्या त्या प्रसंगीं घ्यावयाचीं आहेत अशी कल्पना करावी. अशा आठ संबोधनांनीं संबोधून कवीनें ईश्वरास नमस्कार केला ॥ १ ॥

---

**पदाब्जरज जें तुझें सकलपाव-**
**नाधार तें, अघाचलहि तारिले**
**बहु तुवांचि राधारतें। अजामिळ**
**अघासुर व्रजवधू बकी पिंगळा,**
**अशां गति दिली उरे न तृण भे-**
**टतां विंगळा ॥ २ ॥**

प्रथम ईश्वराच्या पादरजाचा महिमा कवि वर्णितो. पदाब्जरज जें तुझें सकल पावनाधार तें. हे भगवन्,

तुझ्या पादकमलाचें कोणतेंही जें रज-रेणु तें सकल पावनाधार आहे; ह्म० पतितांस पवित्र करणारे जे भागीरथ्यादि सकल पावन पदार्थ त्यांस सर्वस्वें आश्रयभूत आहे. तुझ्या पादरजाच्याच अनुग्रहानें त्यांच्या ठायीं पवित्र करण्याचें सामर्थ्य आलें आहे असा भाव. तुझ्या पादरजाचा एवढा महिमा, मग साक्षात् तुझा महिमा कोणीं वर्णावा ? हें तात्पर्य. माझा महिमा त्वां कोणता पाहिला ? ह्मणशील तर, राधारतें तुवांचि अघाचळहि बहु तारिले. राधानामक गोपीच्या ठायीं रत-रममाण अशा किंवा राधा आहे रत ज्याचेठायीं अशा तुवांचि अघाचळ ह्म० पापपर्वत तारिले. तेही बहु-असंख्य तारिले. परदारासक्त असून पापपर्वत तारणें ही अचिंत्य शक्ति तुझ्या ठायींच आहे असा भाव. कोणते पापपर्वत तारिले ह्मणशील तर, अजामिळ, हा कोणी ब्राह्मण दासीरत व आचारभ्रष्ट होता. अघासुर, हा सर्व गोपाळांस खाण्याकरितां तोंड पसरून बसलेला कोणी दैत्य होता. व्रजवधू-गोकुळांतल्या स्त्रिया, ज्या नवऱ्यांना सोडून परपुरुष जो तूं तुजवर आसक्त झाल्या होत्या. बकी-पूतना, जी तुला मारावयास आली होती. पिंगळा, ही कोणी जनकाच्या नगरींत एक वेश्या होती. असे किती सांगूं ? अशां गति दिली. अशा प्रकारच्या पातक्यांसही तुवां सद्गति दिली. तुझ्या संबंधानें त्यांचें पातक भस्म झालें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कां कीं, उरे न तृण भेटतां विंगळा. तृण ह्म० शुष्क गवत जर विंगळा ह्म० अग्नीला भेटलें तर तें उरेल काय ? उरणार नाहीं. पाप्याचें पाप हें

तृणासारखें आणि तुह्मी अग्नीसारखे, तुह्मांपुढें तें कसें राहील? राहणारच नाहीं ॥ २ ॥

---

**तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें, न तें अनृत वर्णिती बुध जनीं सदाचार जें। असे शत न एक ते सतत बोलती मीच ते, प्रमाण न ह्मणों जनीं उचित माझिया नीचते ॥ ३ ॥**

तुमच्या पादरजानें पापी तारले हें मीच ह्मणतों असें नाहीं; याला शिष्टजनांची उक्ति प्रमाण आहे असें दर्शवीत होत्साता कवि प्रार्थना करितो. तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें. तुझ्या पदाच्या रजें—रजानें, अघनिधी—महापापी, बहुत शोधिले ह्म० शुद्ध केले, किंवा उद्धरण्याकारितां शोधून काढले—असें—याप्रकारें, सदाचार बुध—आचारसंपन्न ज्ञानी जे जनीं वर्णिती ह्म० लोकांमध्यें जें सांगतात तें अनृत नव्हे. त्याला मी खोटें ह्मणूं शकत नाहीं. कां कीं, असे शत, न एक. असे वर्णन करणारे शतशः आहेत, एकच नाहीं. त्यांनीं तरी एक वेळच सांगितलें आहे असें नाहीं, तर, ते सतत बोलती. निरंतर असें खातरीनें बोलतच आहेत. मीच ते प्रमाण न ह्मणों. असें वर्णन करणारे पुरुष जर मी एकटाच प्रमाण ह्म० खरे

ह्मणणार नाहीं तर, उचित माझिया नीचते. हें असत्य मानणें केवळ माझ्या नीचतेला—नीचपणाला योग्य होईल, ह्म० असें ह्मणण्यानें मजकडे नीचपणा मात्र येईल, ह्मणून मला त्या शिष्टांचें बोलणें खोटें ह्मणतां येत नाहीं. मी खोटें ह्मणण्यास सिद्ध आहें, पण ह्मणण्यास मोठी अडचण आहे असा भाव. कां कीं, ही गोष्ट माझ्या अनुभवास आली नाहीं. सर्व पापी शोधिले त्यांत मी कसा चुकून राहिलों असें पुढल्या श्लोकांत कवीला ह्मणावयाचें आहे ॥ ३ ॥

—

**तसाचि उरलों कसा पतित मी नसें काय कीं, कृपाचि सरली असेंहि न घडे जगन्नायकीं। नसेन दिसलों कसा नयन सर्वसाक्षी रवी, विषाद धरिला ह्मणों न सुरभी विष क्षीर वी ॥ ४ ॥**

मागील श्लोकांत तुझ्या पादरजानें, बहुत पापी शोधिले असें थोरथोर ह्मणतात असें कवि बोलला, आतां येथें ती गोष्ट माझ्या अनुभवास कां आली नाहीं अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. तसाचि उरलों कसा. ह्म० मी जसा पापी आहें तसाच कसा राहिलों, किंवा उद्धरल्यावांचून कसा राहिलों? पुन्हा शंका घेऊन ह्मणतो. पतित मी नसें काय?

ह्म० मी मुळीं पतिततच नाहीं काय? नाहीं नाहीं; पतित तर आहेंच, पण असें कसें झालें? कीं ज्या कृपेच्या योगानें पापी उद्धरले जातात ती, कृपाचि सरली. माझ्या वेळेसच भगवंताच्या मनांतील कृपेचें भांडवल संपलें असें ह्मणावें तर, असेंहि न घडे जगन्नायकीं. जो अखिल जगाचा नियंता त्याची कृपा सरली हे संभवत नाहीं. आतां मी पतित आहें आणि भगवंताच्या मनांत कृपाही परिपूर्ण आहे, पण मी भगवंतास दिसलोंच नाहीं, मग ते माझा उद्धार कसा करितील असें ह्मणावें तर, नसेन दिसलों कसा? मी भगवंतास दिसणार नाहीं असें तरी कसें घडेल? कां कीं, नयन सर्वसाक्षी रवी. सर्वसाक्षी ह्म० सृष्टींतील यावत् स्थूल सूक्ष्म पदार्थ पाहणारा असा जो रवी ह्म० सूर्य तो ज्या भगवंताचे नेत्र आहे. सूर्यरूप चक्षूनें पाहणारास कोणताही पदार्थ दिसल्यावांचून राहणार नाहीं; मग मी कसा दिसणार नाहीं? आतां अशी शंका मनांत येते कीं, मी पतित आहें, भगवंताच्या मनांत कृपा आहे आणि मी भगवंतास दिसलोंही आहें, पण भगवंतांनीं मजविषयीं मनांत, विषाद धरिला, ह्म० कंटाळा धरिला, असें ह्मणों ह्म० असें कदाचित् ह्मणावें तर, भगवंतांनीं मनांत कंटाळा जरी धरिला तरी त्यांनीं कोणाचें अनिष्ट केलें नाहीं; याविषयीं दृष्टांत कवि देतो. न सुरभी विषक्षीर वी. सुरभी ह्म० कामधेनु हिनें मनांत विषाद जरी धरिला तरी ती विषरूप क्षीर वीत नाहीं, ह्म० स्तनद्वारा विष प्रसवत नाहीं. तिजपासून अमृतच प्राप्त होतें. तसें मजवि-

षयीं जरी तुमच्या मनांत विषाद आला असला तरी तुह्मी माझें कल्याणच कराल, असा भरंवसा आहे. परंतु हा काळपर्यंत माझ्या उद्धाराविषयीं उपेक्षा झाली ह्मणून मी प्रार्थना करितों असा भाव ॥ ४ ॥

---

**व्रजावन करावया बसविलें नखाग्रीं धरा, सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरा। वराहतनु घेऊनी उचलिली रदाग्रें धरा, सुदुर्धर तुह्मां कसा पतित हा न कां उद्धरा ॥ ५ ॥**

तुह्मी ह्मणाल कीं, तूं जड पतित आहेस ह्मणून तुझा उद्धार करण्याचा मला विषाद आला आहे. तर महाराज, तुह्मीं मजपेक्षां अतिशयित जड पदार्थ उचलले आहेत; असें दाखवीत होत्साता कवि भगवंतास ह्मणतो, व्रजावन करावया बसविलें नखाग्रीं धरा. कृष्णावतारीं तुह्मीं गोकुळांत असतां इंद्रानें गोकुळावर अतिवृष्टि केली त्यासमयीं व्रज—गोकुळ त्याचें अवन—रक्षण करण्याकरितां आपल्या करांगुळीच्या नखाग्रीं धरा ह्म० गोवर्धन पर्वतास, बसविलें. गोवर्धन पर्वत नखाग्रीं धरून गोकुलवासी जन आणि गाई यांचें वृष्टीपासून संरक्षण केलें. गोवर्धन पर्वत लहान होता त्याहून मोठा पर्वत तुह्मीं उचलला, तो कोणता ह्मणाल तर,

सलील तइं मंदराख्याहि नग स्वपृष्ठीं धरा. तइं ह्म० समुद्रमंथनसमयीं कूर्मावतार घेऊन मंदरनामक पर्वत सलील–सहज, अनायासानें आपल्या पृष्ठभागावर धरिता झाला. यापेक्षांही जड पदार्थ तुह्मीं उचलिला, तेंही मी सांगतों. वराहतनु घेउनी उचलिली रदाग्रें धरा. वराहावतारीं वराहतनु ह्म० डुकराचें शरीर धरून रदाग्रें ह्म० दंताच्या अग्रभागानें धरा ह्म० पृथ्वी उचलिली. तर असे असे जड पदार्थ तुह्मी सहज लीलेनें उचलिले असता, सुदुर्धर तुह्मां कसा पतित हा. हा–हा जो मी पतित तो तुह्मांला सुदुर्धर ह्म० उचलावयास अर्थात् उद्धरावयास जड कसा झालों! कशाही जडाचा उद्धार करणें तुह्मांस अशक्य नाहीं; साहजिक आहे. मग न कां उद्धरा. ह्म० माझा उद्धार कां करीत नाहीं! लवकर धांवा आणि माझें रक्षण करून माझा उद्धार करा हें तात्पर्य ॥ ५ ॥

---

**नतावनधृतव्रत ज्वलन तूंचि बा-**
**धावनीं, पदप्रणत संकटीं प्रजव**
**तूंचि बा धावनीं । दया प्रकट**
**दाखवी कवण सांग त्या वारणीं,**
**सतीव्यसनवारणीं जयजयार्थ**
**त्या वा रणीं ॥ ६ ॥**

महाराज, शरणागताचें रक्षण करणें आणि त्याचें

दुःख नाहींसें करणें हें तुमचें व्रतच आहे, ह्मणून धांवा धांवा ह्मणतों; अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करतो, हे नतावनधृतव्रत. नत ह्म० शरणागत त्यांच्या अवनाविषयीं ह्म० रक्षणाविषयीं ज्यानें व्रत ह्म० नियम धरिला आहे अशा भगवंता. तूंचि बाधावनीं ज्वलन. दुःखरूप अरण्यास जाळून टाकण्याविषयीं प्रज्वलित अग्नि तूंच आहेस. आणि पदप्रणतसंकटीं प्रजव तूंचि बा धावनीं. बा देवा तुझ्या चरणास जे प्रणत झाले—शरण आले त्यांस जर संकट पडलें तर त्याच्या निवारणाकरितां धावनीं ह्म० धांव घेण्याविषयीं तूंचि प्रजव ह्म० अति वेगवान् असा तूंच आहेस. मी असा कोणाच्या संकटीं धांवलों ह्मणाल तर, दया प्रकट दाखवी कवण सांग त्या वारणीं. त्या वारणीं—त्या प्रसिद्ध गजेंद्रावर कोणीं दया प्रकट करून दाखविली? सांगा बरें. जेव्हां गजेंद्राचा पाय नक्रानें धरिला तेव्हां निरुपाय होऊन त्या गजेंद्रानें तुह्मांला हाक मारिली, त्यावेळीं तुह्मीच धांवून येऊन त्याला मुक्त केलें ना! तसेंच, सतीव्यसनवारणीं. कौरवसभेंत वस्त्रहरणप्रसंगीं द्रौपदीवर जें संकट पडलें तें दूर करण्याविषयीं धांवून येऊन कोणीं दया प्रघट दाखविली? सांगा बरें. आणि, जयजयार्थ त्या वा रणीं. वा ह्म० अथवा जयजयार्थ ह्म० अर्जुनाच्या जयाकरितां ह्म० भारती युद्धांत भीष्माशीं युद्ध करित असतां अर्जुन घाबरला; भीष्मापुढें अर्जुनास जय मिळेना असें जेव्हां अर्जुनावर संकट पडलें तेव्हां अर्जुनास जय साधून देण्याकरितां अर्जुनाविषयीं दया येऊन शस्त्र घेऊन भीष्मावर कोण

धांवला ? सांगा बरें, तुह्मीचना ? असेच मजकरितां धांवून या अशी मी प्रार्थना करितों, असा भाव ॥ ६ ॥

---

**सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास दारा परी, असा प्रभुहि सेवका भजसि खासदारापरी। प्रियाकुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी, तिहीं अमित काढिल्या नृपमखांत पत्राळी ॥ ७ ॥**

भक्तांविषयीं तुमच्या मनांत इतकी दया भरली आहे कीं, तुह्मी आपला मोठेपणा ऐकीकडे ठेवून भक्तांच्या घरचें हलकें कामही करितां हें दाखवीत होत्साता कवि ह्मणतो—सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास दारा परी. रमा ह्म० लक्ष्मी साक्षात् लक्ष्मीसारखी रूपयौवनवती स्त्री आपली दारा ह्म० भार्या असतां तीही ज्याच्या रतिसुखास पात्र झाली नाहीं. ह्म० विलास करण्याविषयीं लक्ष्मी देखील ज्याला आवडली नाहीं. असा प्रभुहि. अशा योग्यतेचा षड्गुणैश्वर्याचा भोक्ता असतांही, खासदारापरी सेवका भजसि. अर्जुनाचा खासदार ह्म० मोतादादार होऊन अर्जुनाला यजमानाची पदवी देऊन तुवां त्याच्या घोड्यांची चाकरी केली. ही भक्तावर केवढी दया ! यापेक्षांही हलकें काम तुह्मी स्वभक्ताच्या घरीं केलें, तें कोणतें

ह्मणाल तर ऐका. प्रिया कुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी काढिल्या. जिहीं–ज्या हातांनीं प्रिया–लक्ष्मी तिच्या कुचतटीं–स्तनप्रदेशावर पत्रावळी ह्म० विलासार्थ रंगाच्या वेलबुट्या बहुवार न काढिल्या–फारवेळ काढिल्या नसतील. लक्ष्मीशीं विलास करण्याविषयीं तादृश उत्कंठा नसल्यामुळें, असा भाव. तिहीं–त्या हातांनीं नृपमखांत ह्म० धर्मराजाच्या राजसूय यज्ञांत. अमित पत्रावळी काढिल्या ह्म० ब्राह्मणांच्या उष्ट्या पत्रावळी असंख्य काढिल्या–सावडून दूर टाकिल्या. असें जें तुह्मी भक्तांच्या घरीं हलकें काम केलें यास दयेशिवाय दुसरें कारण होतें काय? नाहीं. दयाच कारण; तर ती दया मजविषयीं येऊं द्या ह्मणून मी प्रार्थना करितों, असा भाव ॥ ७ ॥

---

**न पावसि ह्मणोनि मी ह्मणतसें तुला आळशी, बरी न असदुक्ति हे रविसखोत्थिता आळशी। असंख्य जन तर्पिले क्षुधित एकला जेमनीं, चुकेल तरि त्यास दे परि वदान्य लाजे मनीं ॥ ८ ॥**

मी इतकी करुणा भाकीत असतां तुह्मी मजवर दया करीत नाहीं, याजमुळें तुह्मांविषयीं माझ्या मनांत भलतीच कल्पना येते ती मी उघड सांगतों, असा

भावानें कवि ह्मणतो, न पावसि ह्मणोनि मी ह्मणत-सें तुला आळशी. तुह्मी मला लवकर पावत नाहीं ह्म० लवकर येऊन माझा उद्धार करीत नाहीं, यामुळें मी तुह्मांला आळशी असें स्पष्ट ह्मणतों. देवा, तुह्मी आळशी ह्मणून घेऊं नका. तुह्मी ह्मणाल कीं, तूं मला आळशी ह्मणत असलास तर ह्मण. मला काय त्याचें, तर देवा असें नका हो ह्मणूं. कां कीं, बरी न असदुक्ति हे. ही असदुक्ति ह्म० आळशी अशी जी माझ्या तोंडावाटे उक्ति निघाली ती बरी नव्हे; ही फार वाईट आहे. ही तुह्मांला फार जड जाईल. ह्मणजे आळशीपणा घालविण्याकरितां तुह्मांला फार श्रम करावे लागतील. ही असदुक्ति बरी कशी नव्हे ह्मणाल तर, रविसखोत्थिता आळ शी. रविसख ह्म० सत्राजित, त्यापासून उत्थित ह्म० निघालेली जी आळ ह्म० बालांट तिजसारखी आहे—ती जशी बरी नव्हती तशी ही ही बरी नाहीं. कृष्णावतारीं सत्यभामेचा पिता सत्राजित यानें स्यमंतक मणि चोरल्याची आळ तुह्मांवर घातली. ती आळ काढण्याकरितां तुह्मांला किती श्रम पडले हें तुह्मी जाणतच आहां. तशीच ही आळशीपणाची आळ म्यां तुह्मांवर घातली ही बरी नव्हे. तुह्मी ह्मणाल कीं, मी बहुतांचा उद्धार केला आहे. तुला एकट्याला पावलों नाहीं; इतक्यानें मी आळशी होईन कीं, काय. तर असें आहे; कोणी वदान्य ह्म० दाता यानें, असंख्य जन तर्पिले ह्म० भोजन देऊन तृप्त केले. त्यांत एकला—एकच क्षुधित जेमनीं ह्म० भोजनांत चुकेल—जर चुकून राहील.

तर त्या क्षुधितास तो दाता मागाहून अन्न देतो; परंतु तो मनांत लाजे-लाजतो. माझें मुक्तद्वार असतां हा एकच क्षुधित चुकून कसा राहिला असें त्याच्या मनाला तें सलतें; तसें तुह्मी असंख्यजन उद्धरिले त्यांच्या मागून माझाही उद्धार कराल; परंतु तुमच्या मनास अंमळ संकोच होईल. तसें न व्हावें ह्मणून लवकर येऊन माझा उद्धार करा अशी मी प्रार्थना करितां, असा भाव ॥ ८ ॥

---

**अगा प्रणतवत्सला ह्मणति त्या जनां पावलां, ह्मणूनि तुमच्या-च मी स्मरतसें सदा पावलां। करूं बरि कृपा हरूं व्यसन दीन हा तापला, असें मनिं धरा खरा भरंवसा मला आपला ॥ ९ ॥**

जरी मी तुह्मांस आळशी ह्मटलें तरी भक्तजनांस पावण्याविषयीं तुह्मांस फारसें आळवायास नको, हा तुमचा स्वभाव मी जाणतां; अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करतो, अगा प्रणतवत्सला—अगा हे शरणागतवत्सला! असें मनोभावानें अनन्यगति होऊन जे ह्मणती ह्म० हाक मारितात त्या जनांस तुह्मी पावलां ह्म० त्यांवर कृपा केलीच असें समजावें; असा तुमचा

स्वभाव मला समजला आहे. ह्मणोनि तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां. याकरितांच इतर देवांचा त्याग करून तुमच्याच पावलांचें मी स्मरण करित आहें. आतां माझी विनंती आपणास इतकींच आहे कीं, आपण येणार असाल तेंव्हां या; पण हा दीन तापत्रयानें तापला आहे याजवर, बरी कृपा करूं. याचें, व्यसन–संकट हरूं, असें तुह्मी आपल्या मनांत धरा. या गोष्टीचा विसर पडूं देऊं नका. मज दीनाची प्रार्थना ऐकून तुह्मी मनांत धराल, विसरणार नाहीं, असा आपला मला भरंवसा आहे. परंतु मी उतावळा ह्मणून वारंवार तुमची प्रार्थना करतों इतकेंच. एरवीं भक्तांच्या रक्षणाविषयीं आपण सर्वदा दक्ष आहांच. हाक मारण्याचा मात्र विलंब, असें तात्पर्य ॥ ९ ॥

---

**मला निरखितां भवज्वरणकन्य-**
**का आपगा, ह्मणे अगइ ऐ-**
**किलेंहि न कधीं असें पाप गा ।**
**कर श्रवणिं ठेविते नुघडि नेत्र घे**
**भीतिला, न घालिन भिडेस मी**
**जरिहि कार्यलोभी तिला ॥ १० ॥**

इतर देवतांचा त्याग करून तुमच्याच पावलांचें मी स्मरण करीत आहें असें ह्मणतोस तर, इतर देवता तुझा उद्धार करणार नाहींत काय, असें जर

ह्मणाल तर ऐका. एका. देवतेची गोष्ट सांगतों. भवच्चरणकन्यका आपगा. तुमच्या चरणाची कन्या ह्म० तुमच्या पायांपासून झालेली अशी आपगा ह्म० नदी अर्थात् भागीरथी तिजकडे जेव्हां मी स्वोद्धाराकरितां गेलों तेव्हां ती, मला निरखितां ह्मणे. मला पाहतांच ती ह्मणाली, अगइ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप गा. अगाई! असा आश्चर्याचा उद्गार काढून, अगा असें पाप कधींच ऐकिलेंही नाहीं, मग पाहिलें कोठून. जरी मी उद्धाराविषयीं प्रार्थना केली तरी, कर श्रवणिं ठेविते. ती कानावर हात टेविती झाली. येणेंकरून तुझी प्रार्थना मी ऐकत नाहीं असें सुचविलें. कानावर हात ठेवून राहिली काय! नाहीं. नुघडी नेत्र. डोळे उघडून मजकडे पाहीना देखील. फार काय सांगावें, घे भीतिला. तिनें भयच घेतलें. याचें पाप मला डसेल काय असें तिला भय झालें असेल असें मला वाटतें. मग मी आपल्या मनांत निश्चय केला कीं, न घालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला. मी जरी कार्यलोभी आहें ह्म० स्वकार्यसाधनाचा लोभ धरणारा आहें, तरी इतःपर तिला ह्म० भागीरथीला भिडेस घालणार नाहीं. माझें कार्य कर, मझा उद्धार कर अशी मी तिला कधीं भीड घालणार नाहीं; असें ह्मणून मी अकृतार्थ होत्साता तिजपासून परतलों. जी भ्याली तिला भीड घालून तरी काय फळ; ही गोष्ट तुमच्या भागीरथीची सांगितली. अशीच कथा इतर देवतांची समजावी. ह्मणून इतर देवतांचा त्याग करून तुह्मांस शरण आलों, हें तात्पर्य ॥ १० ॥

**सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें, नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें। नता करुनि मुक्तही ह्मणसि मी बुडालों रिणें, अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ॥ ११ ॥**

गंगा भ्याली ह्मणून त्वां गंगेचा त्याग केला ह्मणतोस; असो, पण इतर देवतांनीं तर तुझा धिक्कार केला नाहीं. तर त्यांचें भजन कां करीत नाहींस ? असें जर आपण ह्मणाल तर ऐका,–सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें. इतर देवतांस सदैव–निरंतर नमितां ह्म० त्यांच्या पायांशीं मी आपलें कपाळ घासतां घासतां ललाट किणें पद केलें. किण ह्म० घट्टा त्यानें माझें ललाट–कपाळ पद केलें ह्म० स्थान केलें. कपाळास घट्टे पडले तरी त्यांपासून माझें कार्य होईना, ह्मणून मी तुमचा आश्रय केला आहे. माझी खातरी आहे कीं, नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें. तुमच्या पादकमलावांचून इतर देव कोणी मला तारणारा नाहीं. तुह्मी भक्तांला तारूनच राहतां असें नाहीं तर, नता करुनि मुक्तही ह्मणसि मी बुडालों रिणें. शरणागताचे मनोरथ पूर्ण करून किंबहुना त्याला मुक्तही करून म्हणतां कीं, मी या भक्तांच्या ऋणांत बुडालों आहें. भक्तानें जे मजवर सेवारूप उप-

कार केले आहेत ते त्यास मुक्ति दिल्यानेंही फिटले नाहींत असें म्हणतां. यावरून तुमची कृतज्ञता, परोपकारिता आणि सदयता लोकोत्तर वर्णनीय आहे. म्हणून, अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणं. अशा योग्यतेचा व अशा थोर मनाचा असा भक्तवत्सल दयाळु जो तूं त्या तुजला जो मनुष्य भजत नाहीं त्या मनुष्याच्या जिण्यास म्ह० वांचण्यास धिक्कार असो. व्यर्थ तें जिणें. तुम्हांला न भजणारे किंवा तुम्हांला सोडून इतरांस भजणारे ते जन्मास तरी कशाला आले आणि वांचले तरी कशाला? असा भाव ॥ ११

---

**पटुत्व सकलेंद्रियीं मनुजता सु-**
**वंशीं जनीं, द्विजत्वहि दिलें भ-**
**लें बहु अलभ्य जें कीं जनीं।**
**यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली**
**तरी हावरा, ह्मणे अधिक द्याच**
**कीं अखिल याचकीं हावरा॥ १२**

तुला द्यावयाचें तें मीं दिलेंच आहे ही माझी कृपा नव्हे काय? असें तुम्ही कदाचित् म्हणाल. सकल इंद्रियांचे ठायीं पटुत्व दिलें आहे. म्ह० करचरणादि कर्मेंद्रियें आणि नेत्रश्रवणादि ज्ञानेंद्रियें हीं आपापल्या विषयाच्या ग्रहणाविषयीं समर्थ अशीं केलीं आहेत. पश्वादि योनि न देतां मनुजता म्ह० मनुष्यपण दिलें

आहे. त्यांतही, सुवंशीं जनी ह्म० उत्तम वंशांत जन्म दिलें आहे. त्यांतही जनांमध्यें बहु दुर्लभ जें द्विजत्व ह्म० ब्राह्मणपणा तेंही दिलें आहे. आणखी द्विजत्व असून, यशःश्रवणकीर्त्तनीं रुचि दिली. भगवंताच्या यशाचें श्रवण आणि कीर्त्तन करण्याविषयीं आवड दिली आहे. आणखी द्यावें तें काय ? इतकें दिलें तरी हा—मोरोपंत अधिक वरा द्याच ह्मणे. कीं, आणखी आणखी वर द्या असें ह्मणतो कीं. तस्मात् अखिल याचकीं हावरा. हा मोरोपंत आमच्या संपूर्ण याचकमंडळीमध्यें हावरा आहे; ह्म० ज्याला कितीही दिलें तरी पुरेसें होत नाहीं. आणखी हावें हावें ह्मणतो, अशा स्वभावाच्या मनुष्यास हावरा ह्मणतात, तसा हा आहे. असें तुह्मीं मला ह्मणाल असें माझ्या मनांत आलें आहे. कवीनें भगवंताच्या ह्मणण्याची कल्पना करून त्याचा हा अनुवाद केला आहे ॥ १२ ॥

---

**असें न ह्मणशील तूं वरद वत्सल श्रीकरा, परंतु मज भासलें ह्मणुनि जोडितों मी करा। दिलें बहु भलें खरें परि गमे कृपा व्यंग ती, अलंकृतिमती सती मनि झुरे न जों संगती ॥ १३ ॥**

मागील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें तुह्मी मला ह्म-

णाल असें माझ्या मनांत प्रथम आलें खरें, पण तसें होणार नाहीं अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. असें न ह्मणशील तूं वरद वत्सल श्रीकरा. हे श्रीकरा! ज्याच्या हातांत लक्ष्मी आहे अशा हे भगवंता,–वर देणारा आणि वत्सल–दयालु असा जो तूं तो तूं असें न ह्मणशील. इंद्रियपटुत्वादि जें द्यावयाचें तें तुला दिलें असतां आणखी वर द्या ह्मणतोस, तस्मात् तूं हावरा आहेस असें तुह्मी मला कदापि ह्मणणार नाहीं. कां कीं, तुह्मी वर देण्याविषयीं समर्थ आहां, भक्तजनांवर दया करणारे आहां आणि लक्ष्मी तुमच्या स्वाधीन आहे; तुह्मांपाशीं कशाची न्यूनता नाहीं, म्हणून तुह्मी तसें ह्मणणार नाहीं. परंतु मज भासलें. कदाचित् तुह्मी ह्मणाल असें मला उगीच वाटलें, ह्मणून मीं बोलून दाखविलें, हा माझा अपराध आहे. ह्मणुनि जोडितों मी करा. अपराध झाला असें समजून मी तुह्मांला हात जोडतों. ह्या माझ्या अपराधाची क्षमा करावी असा भाव. परंतु आपणांस आणखी विनंती करतों. दिलें बहु भलें खरें परि गमे कृपा व्यंग ती. तुह्मीं मला इंद्रियपटुत्वादि पुष्कळ आणि चांगलें दिलें खरें. मी नाहीं दिलें असें ह्मणत नाहीं. परि, परंतु आपण जी मजवर कृपा केली ती व्यंग गमे, ह्म० उणीशी वाटते. पायांचें दर्शन दिल्यावांचून कृपा पूर्ण ह्मणतां येत नाहीं आणि जर पूर्ण कृपा नाहीं तर त्या दिलेल्या पदार्थांचा तरी काय उपयोग आहे, असा भाव. यास दृष्टांत कवि देतो. अलंकृतिमती सती मानें झुरे न जों संगती. रत्नमय आणि सुवर्णमय अलंकारांनीं

अलंकृत झालेली कोणी साध्वी स्त्री जोंपर्यंत संगती-सहवासी प्राणप्रिय नाहीं ह्म० त्याची भेट झाली नाहीं तोंपर्यंत मनिं झुरे, मनांत झुरत असते. ती ह्मणते माझ्या प्राणवल्लभाचें दर्शन जर मला होत नाहीं तर ह्या अलंकारांस घेऊन मी काय करूं; यांजपासून मला सुख न होतां उलटें दुःख मात्र होणार. तशीच माझ्या मतीची गति झाली आहे असा भाव ॥ १३ ॥

---

## कराल पुरती दया तरि असो दिलें पावलें, परंतु हरि एकदा त्वरित दाखवा पावलें। प्रसाद करणें मनीं जरि नसेल हें आंवरा, जया बहु तयास द्या मज कशास मी हावरा॥ १४॥

पूर्ण दया करावयाची ती मनास आली तर करूं असें जर आपल्या मनांत असेल तर मी आपणांस स्पष्ट विनंती करतों. कराल पुरती दया तरि असो दिलें पावलें. जर आपण मजवर पुरती ह्म० पूर्ण दया कराल तर जें मला आपण दिलें-इंद्रियपटुत्वादि पूर्वोक्त दिलें आहे तें मला पावलें ह्म० तें मी स्वीकारलें; परंतु पूर्ण दया करण्यास उशीर लावूं नका. हे हरि, एकदा आपलीं पावलें मला त्वरित दाखवा, ह्मणजे मी कृतार्थ होईन. आणखी आपणांस एक

सांगतो कीं, प्रसाद करणें मनीं जरि नसेल हें आंवरा. जर तुमच्या मनांतून मज दीनावर प्रसाद करावयाचा नसेल ह्म० पूर्ण कृपा करावयाची नसेल, तर हें आंवरा. हें ह्मणजे इंद्रियपटुत्वादि दान जें आपण मला दिलें आहे हें माघारें घ्या. पूर्ण कृपा नाहीं तर हें मला नको. जया बहु तयास द्या. पूर्ण कृपा नसली तर नसो, इंद्रियपटुत्वादि मिळालें ह्मणजे पुष्कळ झालें, असें ज्यास वाटत असेल त्यास हें द्या. मज कशास ? मी हावरा. तें तरी मला कशाकरितां देतां ? मी हावराच आहें. हावऱ्याला कितीही दिलें तरी त्याची तृप्ति व्हावयाची नाहीं; मग देऊन फळ काय ? हें भक्ताचें देवाशीं लडिवाळपणाचें भाषण आहे असें बाह्यात्कारीं दिसतें. पण या भाषणाचें तात्पर्य निराळेंच आहे; तें असें कीं, इंद्रियपटुत्वादि सर्व धर्म देहसंबंधानें आहेत, देहावांचून ते धर्म राहात नाहींत. ते सर्व आंवरा ह्म० देहच आंवरा असें ह्मटल्याप्रमाणें झालें. ह्म० देहच मला नको हें तात्पर्य ॥ १४ ॥

---

दिलें फिरुनि घेतलें अशि अ-
कीर्ति लोकीं न हो, सुनिर्मळ तु-
झीं पदें कधिं तरी विलोकीन हो।
निजप्रियजनांकडे तरिहि दे ह-
वाला जशी, पडेल समजाविशी
तशि करोत कां लाजशी ॥ १५ ॥

हो; महाराज, मी तुह्मांवर रुसून इंद्रियपटुत्वादि माघारें घ्या ह्मटलें तितक्यावरून कदाचित् तुह्मी तें माघारें घ्यावयास राजी व्हाल; पण घेऊं नका हो! माघारें घेण्यांत चांगलें होणार नाहीं, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. दिलें फिरुनि घेतलें अशि अकीर्ति लोकीं न हो. देवानें भक्तास दान दिलें होतें; पण तें त्यानें भक्तापासून माघारें घेतलें, अशी सर्व जगांत तुमची अकीर्ति होऊं नये. दिलेले पदार्थ माघारें घेणें हें दात्याच्या अपकीर्तीस कारण आहे. तर अशी तुमची अपकीर्ति लोकांत होऊं नये असें मी इच्छितों. आता तुह्मी पूर्ण कृपा करून मला पावलें दाखविणार नाहीं. तर राहूंद्या या वेळेस. ज्या पावलांस अपकीर्तीचा यत्किंचितही मळ लागला नाहीं अशीं जीं तुमचीं सुनिर्मळ पदें—पावलें तीं कधीं तरी विलोकीन. या जन्मी नाहीं तर जन्मांतरीं तरीं पाहीन; कांहीं चिंता नाहीं. आतां मजवर पूर्ण कृपा करून मला स्वतां कृतार्थ करावयाचें नसेल तर असें तरी करा. निजप्रियजनांकडे तरिहि दे हवाला. तुमचे जे प्रियभक्त असतील त्यांजकडे तरी माझ्या कार्याचा हवाला द्या, ह्मणजे त्यांजकडे तें सोंपवा. त्यांजकडे हवाला दिल्यानें काय होणार असें ह्मणाल तर, जशी पडेल समजाविशी तशी करोत. माझ्या कार्याविषयीं माझी समजूत त्यांच्यानें जशी करवेल तशी ते करोत. त्याचा बोभाट तुह्मांकडे येणार नाहीं. मग कां लाजशी. मग साधुजनांकडे हवाला देण्याविषयीं तुह्मी कां लाजतां ह्म० कां संकोच करतां? सारांश मला कृता-

थें तुमच्यानें स्वतां करवत नसेल तर तुह्मी आपल्या भक्तांकडून करवा असा भाव ॥ १५ ॥

---

अहा निपट धृष्ट मी प्रभुवरासि कां लाजशी, ह्मणें तुज नसो त-शी विकृति भाविकाला जशी। परंतु अपराध हा गुरु म्हणोनि शिक्षा करीं, असेचि धरिली नय-च्युतदमार्थ दीक्षा करीं ॥ १६ ॥

मागल्या श्लोकांत कवीनें कां लाजशी असें जें भगवंतास ह्मटलें हें दांडगेपणाचें भाषण झालें, असें मनांत आणून कवि प्रभूस प्रार्थना करतो. अहा निपट धृष्ट मी. अहा! काय सांगावें मी केवळ दांडगा आहे. कां कीं, प्रभुवरासि कां लाजशी ह्मणें. त्रैलोक्याचा जो प्रभु—स्वामी त्याला कां लाजतोस असें ह्मटलें. हा माझा मोठाच उद्धटपणा झाला. या माझ्या बोलण्यानें तुह्मांस खचित राग येईल ह्मणून मी प्रार्थना करितों. हे प्रभो! या भाषणानें, तुज नसो तशी विकृति भाविकाला जशी, भाविकाला मला ह्म० मी जो तुमचा भोळा भक्त त्या मला जशी विकृति झाली तशी विकृति तुज नसो—तुला न होऊ; ह्मणजे माझ्या मनास जसें वाईट वाटलें तसें तुझ्या मनास वाईट वाटूं नये. परंतु अपराध हा गुरु. परंतु

मजकडून हा मोठा अपराध घडला खरा. असा अपराध म्यां पुन्हां न करावा, ह्मणोनि शिक्षा करीं. ह्मणून तुह्मीं मला निःशंकपणें शिक्षा करा; अनमान करूं नका. कारण कीं, असेचि धरिली नयच्युतदमार्थ दीक्षा करीं. नयच्युतदमार्थ दीक्षा करीं धरिली असेचि. ह्म० जे कोणी नयच्युत होतील ह्म० न्यायमार्ग सोडून अन्यायानें वर्त्ततील त्यांस दम ह्म० दंड करण्याविषयीं दीक्षा ह्म० नियमरूप काठी हातांत धरिली आहेच. अपराध्यास शिक्षा करण्याचें तुमचें व्रतच आहे. मग माझ्या अपराधाबद्दल मला शिक्षा करण्यास काय चिंता आहे असा भाव ॥ १६ ॥

---

**सदैव अपराध हे रचितसें असे कोटि गा, स्वयेंहि कथितों नसे तिळहि लाज मी कोटिगा। अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा, न त्यांत अवकाश या स्थळ दिलें तदा कां दवा ॥१७॥**

असे अपराध मजकडून नेहमीं घडतात, त्यांची क्षमाच करावी हें बरें, एतदर्थ कवि प्रार्थना करतो. सदैव अपराध हे रचितसें असे कोटि गा. अगा प्रभो! असे-अशा प्रकारचे हे अपराध सदैव-निरंतर

मी रचितसें—करितसें ते थोडे नाहींत. तर कोटि-कोटिशः अपराध. ह्म० अपराधांचे ढीग घातले आहेत; आणि, स्वयेंहि कथितों. मीच अपराध करतों आणि मीच ते आपल्या तोंडानें सांगतों. नसे तिळहि लाज. आपले अपराध आपल्या तोंडानें बोलावयास मला तिळभरही लाज वाटत नाहीं. तस्मात्, मी कोटिगा. ह्म० मी मोठाच कोडगा आहें. कोडग्याला लाज कोठची असणार ? तर आतां हे माझे अपराध आपण आपल्या पोटांत घालावे हेंच बरें. आपण ह्मणाल कीं, या वीतभर पोटांत तुझ्या अपराधांचे ढीग मावतील कसे? तर महाराज, अजांडशतकोटि ज्या उदरीं सर्वदा नांदवा. ज्या उदरामध्यें अजांडशतकोटि ह्म० ब्रह्मांडाच्या शतांच्या कोटि अर्थात् अनंत ब्रह्मांडें सर्वदा—नेहमीं नांदवितां—वागवितां. न त्यांत अवकाश या. त्या उदरांत या माझ्या इतक्याशा अपराधांस अवकाश ह्म० ठेवावयास जागा नाहीं काय ? नाहीं असें कसें होईल. जर ब्रह्मांडांनीं पोट भरलेलें आहे, व त्यांत दुसरा पदार्थ ठेवावयास जागा नाहीं ह्मणावें तर, स्थळ दिलें तदा कां दवा. कृष्णावतारीं ज्या समयीं दव ह्म० वणवा व्रजवासी जनांस जाळावयास प्रवृत्त झाला त्या समयीं त्या व्रजवासी जनांवर दया करून त्या दवानलाला तुह्मीं गिळून टाकिलें असें आह्मी ऐकतां. तर त्या समयीं त्या दवाला स्थळ कां दिलें—जागा कशी दिली ? स्थळ होतें ह्मणून दिलें ना ? तसेंच माझ्या अपराधांस स्थळ द्या असा भाव ॥ १७ ॥

---

**तुझ्या जिरविले बहु प्रणतमंतु पोटें पण, त्यजी मदपराध हें म- जकडेचि खोटेपण । दवाग्नि ज- ठरीं अतिक्षुधित त्यास हें अन्न द्या, वितृष्ण करिती श्रितां तुम- चिया दयासन्नद्या ॥ १८ ॥**

माझ्या अपराधांस तुमच्या पोटांत स्थल द्या असें जें मी ह्मटलें ही गोष्ट कांहीं नवी नाहीं. तुमच्या पोटाचें कामच तें आहे अशी प्रार्थना करून कवि ह्मणतो. तुझ्या जिरविले बहु प्रणतमंतु पोटें. तुझ्या पोटें—पोटानें प्रणतमंतु ह्म० शरणागतांचे अपराध बहु जिरविले ह्म० पुष्कळ घेऊन नाहींतसे केले. पण त्यजी मदपराध. परंतु तें पोट माझे अपराध टाकितें, आंत घेत नाहीं—आंत जागा नाहीं ह्मणतें याचा दोष पोटाकडे नाहीं. हें मजकडेचि खोटेपण. हें खोटेपण ह्म० हा दोष मजकडेच आहे; म्यां इतके अपराध कां करावे! माझे अपराधच फार आहेत. इतक्यांस जागा पोट कोठून देईल? हें नीटच आहे. जागा तर नाहीं खरी; पण एक यु- क्ति सुचली ती सांगतों. दवाग्नि जठरीं अतिक्षुधित त्यास हें अन्न द्या. तुह्मी जो दवाग्नि जठरांत—पोटांत ठेविला आहे तो फार क्षुधित झाला असेल त्यास माझे अपराध हें अन्न द्या ह्म० त्याला खावयास द्या. असें

केल्यानें दवाग्नीची क्षुधा शांत होईल आणि माझ्या अपराधांनीं पोटांत अडचणही व्हावयाची नाहीं. ही युक्ति मज अल्पबुद्धीला चांगलीशी वाटली म्हणून त्यां निवेदिली; पण याहूनही चागल्या शतशः युक्ति आपणांमध्यें भरल्या आहेत. कां कीं, वितृष्ण करिती श्रितां तुमचिया दया सन्नद्या. तुमच्या दयारूप उत्तम नद्या श्रितां म्ह० आश्रितजनांस कोणत्या तरी युक्तीनें वितृष्ण करिती म्ह० तृष्णारहित--इच्छारहित करतात. अर्थात् आश्रितांचे मनोरथ पूर्ण करून त्यांची तृष्णा दूर करतात. याजकरिता तुमची दयानदी मजकडे वळू द्या. ती वळली म्हणजे मला कृतार्थ होण्यास क्षणही नको असा भाव ॥ २८ ॥

---

**न होय कवणाहि तें तुमचियाचि लीलालसें, पदें चरित दाविजे त्रिजगदब्जकीलालसें। मदुद्धरणमात्र कां जड तुम्हां दिसे वारिती, स्वकव्यसन मर्त्यहीन करितीच सेवा रिती॥ १९ ॥**

लोकहिताकरितां मोठमोठीं कृत्यें आपण केलीं. त्यांपुढें माझें कार्य कांहींच नाहीं, अशा अभिप्रायानें कवि म्हणतो. न होय कवणाहि तें तुमचियाचि लीलालसें पदें चरित दाविजे. जें कृत्य कोणाच्यानेंही

व्हावयाचें नाहीं असें चरित ह्म० कृत्य तुमच्याच लीलालसें पदें दाविजे. ह्म० लीलेनें अलस-मंद झालेलें जें तुमचें पद-पाय तें करून दाखवितें. ह्म० तसेंही कृत्य सहज खेळतां खेळतां करितें असा अर्थ. असें कृत्य कोणतें ह्मणाल तर, त्रिजगदब्जकीलालसें. त्रिगत्-ब्रह्मांड हेंच अब्ज-कमल तत्संबंधी कीलाल ह्म० उदक अर्थात् गंगोदक यासारखें. वामनावतारीं बळीचा छळ करण्यासाठीं जेव्हां एक पाय वर उचलला तेव्हां त्या पायानें ब्रह्मांडकटाह फुटून बाहेरचें आवरणोदक ब्रह्मांडांत आलें. तीच ही गंगा जगत्पावनी प्राप्त झाली. असलीं अचाट कृत्यें तुह्मी सहज लीलेनें करितां. असें असतां, मदुद्धरण मात्र कां जड तुह्मां दिसे. माझा उद्धार करणें हें कृत्य मात्र तुह्मांला अवघड कां वाटतें ? अवघड तर नाहींच; पण तुह्मी उपेक्षा करितां असें मला वाटतें. तर महाराज, माझी दीनाची उपेक्षा करूं नका. आपण सर्वसमर्थ जगत्प्रभु आहां. आपली काय गोष्ट सांगावी? यःकश्चित् मनुष्याचीही रीति पाहिली तर, वारिती स्वकव्यसन मर्त्यही. सामान्य मानवही स्वकव्यसन वारिती. ज्यांस स्वकीय ह्मटलें त्यांचें व्यसन-संकट दूर करतात. कारण, न करितीच सेवा रिती. त्याची सेवा रिती ह्म० निष्फळ करीत नाहींत. स्वकीयांचें दुःख निवारण हेंच त्यांच्या सेवेचें फळ त्यांस ते देतात. मग तुमच्या सेवकांस सेवेचें फळ मिळणार नाहीं असें कसें घडेल ? असा भाव ॥ १९ ॥

**दयाब्द वळशील तूं तरि न चातकां सेवकां, उणें कमपि भाविकां उबगशील तूं देव कां। अनन्यगतिका जना निरखितांचि सोपद्रवा, तुझेंचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा ॥ २० ॥**

या समयीं माझा उद्धार आपण करीत नाहीं तर राहूं द्या. पण आपली दया मजवर असूं द्या, ह्मणजे झालें, अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करितो. दयाब्द वळशील तूं तरि न चातकां सेवकां उणें किमपि. तूं दयाब्द ह्म० दयारूप उदकाची वृष्टि करणारा मेघ आहेस. तूं जर वळशील, ह्म० आह्मां दीनांकडे मुरडून आह्मांवर दयाजलाची वृष्टि करशील तर आह्मां सेवकां चातकां ह्म० आह्मी सेवक हेच चातकपक्षी ह्यांस किमपि उणें नाहीं. त्यांचे मनोरथ पूर्ण झालेच असें समजावें. उदक मिळविण्याविषयीं चातकांला मेघावांचून दुसरी गति नाहीं. ह्मणून मेघ चातकांची उपेक्षा करीत नाहींत. तशी अनन्यभावें करून जे तुला शरण आले त्या भाविकांस ह्म० भक्तांस तूं तरी कां उबगशील—कां उपेक्षिशील ? त्यांची तूं उपेक्षा करणार नाहींस. कारण कीं, तुझा स्वभाव फार दयाळू आहे. तुझ्यानें उपेक्षा करवणारच नाहीं. कां कीं, पाहा; अनन्यगतिका

जना निरखितांचि सोपद्रवा. आपणावांचून ज्याला दुसरी गति नाहीं तो अनन्यगतिक, अशा अनन्यगतिक जनाला—भक्तजनाला सोपद्रव ह्म० पीडित पहातांच. तुझेंचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा. हे करुणार्णवा—हे दयासागरा, तुझेंच मन उमोप द्रवा धरी. तुझ्याच मनाला दयेचा द्रव सुटतो तो फारच सुटतो. तुमच्या भक्ताला किंचित् दुःख झालें तर तुमचें मन कळवळतें. मग तुह्मी त्याची उपेक्षा कशी कराल? करणार नाहीं असें तात्पर्य ॥ २० ॥

---

**कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं, तयांत अविशुद्ध मी शलभ जेंवि दावानळीं । व्रणार्थ पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे, स्मरादि रिपु मन्मनीं अहि न काळ भेका कसे ॥ २१ ॥**

देवा, आपण ह्मणाल कीं, तुला तर सध्यां कोणाचा उपद्रव नाहींना? कोणी उपद्रव करील तेव्हां पाहूं-तर मला बहुतांचा उपद्रव आहे. एक तर हा जबर, दस्त कळी आणि त्याचे सोबती कामक्रोधादि षट्शत्रु यांचा उपद्रव मला फार आहे, असें दाखवित होत्साता कवि ह्मणतो. कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा

नळीं. कळि सामान्य आहे काय? ज्याला पातकाचा लेश नाहीं असा सुनिर्मळ जो नळ राजा त्याच्या ठायीं तो कळि परम उग्र-मोठा भयंकर असा ह्म० दावा द्वेष करिता झाला. कळीनें नळाचा फार छळ केला; परंतु तो नळराजा पुण्यवान् ह्मणून समर्थ कळीच्या हातून सुटला. येथें माझी गरिबाची काय कथा. तयांत अविशुद्ध मी शलभ जेंवि दावानळीं. तयांत ह्म० त्या कळीच्या झपाट्यांत मी अविशुद्ध-अत्यंत अपवित्र पातकी, कसा होईन कीं, शलभ जेंवि दावानळीं. दावानळांत-वणव्यांत जसा टोळ ह्म० वणव्यांत जी टोळाची अवस्था तीच कळीच्या झपाट्यांत माझी. हें एक कळीचें भय मला मोठें आहे. आणखी वनीं-रानांत पशुच्या शिरावरी-गाई, ह्मशी इत्यादिकांच्या मस्तकावर व्रणार्थ ह्म० क्षत करण्याकरितां कावळे जसे उभे असतात तसे स्मरादिरिपु मन्मनीं. स्मर ह्म० काम तो ज्यांत प्रमुख असे जे क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे सहा शत्रु माझ्या मनाला टोंचण्याविषयीं अर्थात् भ्रष्ट करण्याविषयीं टपत उभे आहेत. त्यांच्या झपाट्यांत म्यां दुर्बळानें कसें टिकावें. यास दृष्टांत. अहि न काळ भेका कसे. भेकाला म्ह० बेडकाला अहि ह्म० सर्प काळ कसे नव्हत-मृत्युस्वरूप कसे नव्हत. एका सर्पापुढें टिकणार नाहीं तो एकटा बेडूक अनेक सर्पांपुढें कसा टिकेल? साप जसा बेडकाला गटकन गिळून टाकतो तसे हे कामादि रिपु मला केव्हां गिळून टाकितील हें समजणार नाहीं. तर उपद्रव मला लहान आहेत काय? फार मोठे आहेत. त्या उपद्रवांनीं मी

फार पीडित आहें. ह्मणून मजविषयीं करुणा येऊं द्या, अशी प्रार्थना कारितां असा भाव ॥ २१ ॥

---

**तरेन तुमच्या बळें भवमहानदी नाविका, तुह्मीच मग आतरा-स्तव मला सुदीना विका । असे विदित वासही मज सदाश्रमींचा करा, दया गुण पहा सवे मज सदा श्रमीं चाकरा ॥ २२ ॥**

पूर्वोक्त शत्रूंच्या उपद्रवामुळें या भवनदींतून पार पडणें फार कठीण आहे. तरी तुमच्या कृपेच्या यो-गानें मी पार पडेन, अशा अभिप्रायानें कवि भगवंतास ह्मणतो. तरेन तुमच्या बळें भवमहानदी नाविका. हे नाविका ? हे तारणाऱ्या देवा, ही भवमहानदी—संसाररूप मोठी दुस्तर नदी ही तरून जाणें फार कठीण खरें; तरीही, तुमच्या बळें—तुमच्या आश्रयानें मी सुखानें त-रून जाईन असा माझा निश्चय आहे. नावाड्या ख-बरदार मिळाल्यावर मोठी नदीही तरून जाणें कठीण नाहीं. तुह्मी कृपा करून मला ह्या घोर नदीच्या पार न्या. आतां तुह्मी मला नदी उतरून पार नेल्यावर तुह्मांला उतार दिला पाहिजे, तो द्यावयास तर मज-पाशीं कांहीं नाहीं. ह्मणून, तुह्मीच मग आतरास्त-व मला सुदीना विका. मग आतरास्तव; आतर ह्म०

नोर किंवा उतारा आपला फेडून घेण्याकारितां सुदीन ह्म० गरीब दरिद्री जो मी त्या मला तुह्मीच आपल्या हातानें विका. अर्थात् विकून जें मोल येईल त्यानें आपला उतारा फेडून घ्या. आपण ह्मणाल कीं, तुला विकत घेतो कोण ? कोणाकडे तुला विकावें ? तर तुमचे भक्त साधुजन पुष्कळ आहेत त्यांजकडे मला विका. कां कीं, असे विदित वासही मज सदाश्रमींचा. सदाश्रमींचा वास ह्म० साधूंच्या आश्रमांत कसा वास करावा, त्यांची मर्जी कशी संभाळावी, हेंही मला ठाऊक आहे; ह्मणून त्यांकडे विका असें ह्मणतों. तर दया करा, गुण पाहा. साधूंकडे विकण्याची दया करा, आणि साधूंच्या घरीं राहण्याचा गुण माझ्या अंगीं आहे कीं नाहीं तो पहा. मी इतकें खातरीनें कां बोलतों कीं, सर्व मज सदाश्रमीं चाकरा. मज चाकरा सदाश्रमीं सर्व ह्म० साधूंचा चाकर—सेवक जो मी त्या मला सदा—निरंतर श्रमीं—श्रम करण्याविषयीं ह्म० कष्ट करण्याविषयीं सर्व ह्म० संवय—अभ्यास आहे. साधूंच्या घरीं कष्ट करण्याचें मला कठीण पडावयाचें नाहीं. यासाठीं साधूंकडे मला विका असें ह्मणतों ॥ २२ ॥

---

**धना परिजनां घरीं तुमचिया उणें कायसें, न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें। परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठे-**

## विती, गुणा न ह्मणतां उणा अधिक आदरें सेविती ॥ २३ ॥

साधूंकडे मला विका असें मीं ह्मटलें खरें, पण आपल्या मनांत असें येईल कीं, माझे भक्त जे साधु ते दरिद्री आहेत, त्यांजपासून तुझें मोल मला काय मिळावयाचे आहे ? तर हें खरेंच आहे, ह्मणून त्यांकडे न विकतां तुह्मीच आपणाजवळ मला ठेवून मजपासून चाकरी घेऊन आपला उतार फेडून घ्या, अशा अभिप्रायानें पुन्हा कवि ह्मणतो. धना परिजनां घरीं तुमचिया उणें कायसें. महाराज, तुमच्या घरीं धनाला आणि परिजनांला ह्म० चाकरमाणसांला उणें कशाचें ! उणें कांहीं नाहीं. ह्म० माझें मोल घेऊन किंवा मला चाकरीस ठेवून आपणांला अधिक काय व्हावयाचें आहे, कांहीं नाहीं असें तात्पर्य. याला दृष्टांत; न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें. मणिहेमभूपतिस–मणि ह्म० रत्नें, हेम–सुवर्ण आणि भू–भूमि यांचा पति–स्वामी ह्म० हीं ज्यापाशीं विपुल आहेत अशा श्रीमंतास जोडिल्या आयसें–मिळविलेल्या लोखंडाच्या तुकड्यानें मोठा लाभ झाला असें व्हावयाचें नाहीं. तसें मला जोडल्यानें तुह्मांला मोठा लाभ होईल असें नाहीं, हें खरें आहे. परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती. परंतु ह्या पृथ्वीवर जे समर्थ आहेत तेही सर्व लहान मोठ्या वस्तु ह्म० पदार्थ संग्रहास ठेवतात आणि, गुणा न ह्मणतां उणा अधिक आदरें सेविती. एकाद्या पदार्थांत गुण कमी

असला तरी त्या गुणाला उणा न म्हणतां अधिक आदरानें-आस्थापूर्वक सेवितात म्ह० कधीं कधीं त्यास उपयोगांत घेतात. अशी जनरीति आहे म्हणून माझ्या संग्रहानें जरी आपणांस मोठासा लाभ नाहीं तरी आपण प्रभुवर्य आहां; माझा गुण उणा न मानितां मला आपल्या संग्रहीं ठेवा, ही माझी प्रार्थना आहे असा भाव ॥ २३ ॥

---

**दिसें ह्मणुनि शाश्वतप्रकृति रंक मी काय हो, प्रसन्न तुमचा बरें मजवरी प्रभो पाय हो। क्षण त्यजुनि इंदिराबृहदुरोजसंगा धरा, शिरीं पद मिळो सखा सम सुशील गंगाधरा ॥ २४ ॥**

आपण म्हणाल कीं, तूं रंक-भिकार दिसतोस. आम्हां श्रीमंतांजवळ तूं चाकर शोभणार नाहींस, तर महाराज ! दिसें म्हणुनि शाश्वतप्रकृति रंक मी काय हो ? मी दिसें-वर वर रंकसा दिसतों म्हणून शाश्वत प्रकृति रंक आहें काय ? म्ह० माझा रंकपणा कधीं जावयाचा नाहीं असा आहे काय ? जावयाजोगा आहे. कशानें जाईल म्हणाल तर, सांगतों. प्रसन्न तुमचा बरें मजवरी प्रभो पाय हो. अहो प्रभो, तुमचा पाय मात्र मजवर प्रसन्न होऊं द्या बरें; मग मी रंक आहें कीं राजा आहें हें तुमच्या दृष्टीस पडेल. पाया-

चा प्रसन्नपणा इतकाच कीं, क्षण त्यजुनि इंदिराबृह-दुरोजसंगा धरा शिरीं पद. तुमची स्त्री लक्ष्मी तुम-चा पाय आपल्या स्तनांवर ठेवीत असते, ह्मणून ह्मणतों. इंदिरा–लक्ष्मी तिचा जो बृहदुरोज–पुष्टस्तन त्याचा संग क्षणभर सोडून, पद माझ्या शिरीं ठेवा ह्म० लक्ष्मीच्या स्तनावर न ठेवितां माझ्या मस्तकावर ठेवा. असें केल्यानें काय होणार ह्मणाल तर, ठेवून चम-त्कार पाहा काय होईल तो. पाहिजे तर मी अगोदर सांगतों. मिळो सखा सम सुशील गंगाधरा. पाय मस्तकीं ठेवल्यानें गंगाधर जो महादेव त्याला सम–आपल्यासारखा आणि सुशील–सुस्वभावाचा असा सखा ह्म० सोबती मिळो–मिळूं द्या. तुमच्या पायांत गंगा आहे तो पाय माझ्या मस्तकीं आला म्हणजे मी गंगाधर होईन. मग अर्थात् शिवाचें सादृश्य मला येईल. असें झाल्यावर माझा रंकपणा जाईल का राहील हें तुम्हीच पाहा असा भाव ॥ २४ ॥

---

**प्रभुस्तुति न ठाउकी परि ति-**
**च्या महाकामुका, मला कृपण**
**मारितो बहु सकाम हाका मुका।**
**ह्मणा मनिं असें कसें प्रथम नीट**
**ये लेकरा, हळूहळु पटु स्वयें सु-**
**पथिं लावियेलें करा ॥ २५ ॥**

मी तुमच्या घरचीं कामें करीन, पण तुमची स्तुति मला करतां येणार नाहीं. तेवढी तुम्ही मला शिकवा, अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करतो.. प्रभुस्तुति न ठाउकी. ज्या प्रभूजवळ सेवेस राहावें त्या प्रभूची स्तुति केली पाहिजे. मला तर प्रभूची स्तुति कशी करावी ती ठाऊक नाहीं; परि तिच्या महाकामुका. परंतु अहो तिच्या महाकामुका म्ह० स्तुतीच्या इच्छिणाऱ्या देवा, तुम्हांला तर स्तुति फारच आवडते; म्हणून मी जी वेडीवांकडी स्तुति करीन ती ऐकून घेऊन तुम्ही आपल्या मनांत असें म्हणा कीं, मला रुपण मारितो बहु सकाम हाका मुका. हा मुका आहे. याला चांगलें बोलतां येत नाहीं, तरी हा बहु सकाम आहे म्ह० कांहीं मागतो आहे, असा हा मला हाका मारित आहे असें मनांत म्हणा. कां कीं, कसें प्रथम नीट ये लेकरा. मी लेकरूं अज्ञान. मला लेकराला पहिल्यांनेच नीट कसें येईल, म्ह० चांगली स्तुति करतां कशी येईल म्हणून, हळूहळु पटु स्वयें सुपथिं लावियेलें करा. स्वयें सुपथिं लावियेलें लेकरूं हळूहळू पटु करा म्ह० स्वतां सुमार्गास लावून हळु हळू स्तुति करण्याविषयीं चतुर–शहाणें करा. म्ह० तुमची स्तुति करण्यास तुम्हीच मला शिकवा असें तात्पर्य ॥ २५ ॥

---

## जनीं तरि असें असे शिशुहि जे मुखें वर्ण वी, पिता पिउनि ते भुले मधुरता सुखें वर्णवी। मना ज-

**रि न ये गुरूक्तिहि ह्मणे कटु प्रायशा, दयानिधि तुह्मां पुढें जनकथा अशा कायशा ॥ २६ ॥**

मी जी वेडीवांकडी स्तुति करीन तिचें तुह्मी कौतुक मानून घ्या असें मी कां ह्मणतों कीं, जनाची रीत मी पाहतों तसें बोलतों, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. मनीं तरि असें असे. लोकांत तर अशी रीत आहे कीं, शिशुहि जे मुखें वर्णवी. लहान मुलही जे वर्ण ह्मणजे शब्द मुखें वी ह्म० तोंडावाटे काढितो; पिता पिउनि तें भुले. ते शब्द वेडेवांकडे कसेही असले तरी, पिता—त्या मुलाचा बाप पिऊन ह्म० ऐकून भुले—भुलतो, ह्म० मोहित होतो; त्यांचें मोठें कौतुक मानितो; आणि मधुरता सुखें वर्णवी. तसलेही शब्द ऐकून पित्याला जें सुख होतें त्या सुखाच्या योगानें त्या शब्दांची मधुरता—गोडी आपण तर वर्णितोच, पण लोकांकडूनही वर्णवितो. तो ह्मणतो, कायहो शेजारी बावा! माझा मुलगा पाहिलाना कसा बोलतो तो! शेजारी उत्तर करितो. काय सांगावें! फार चांगलें बोलतो. हा पुढें मोठा शहाणा निघेल. असें शेजाऱ्याचें भाषण ऐकून पित्याला फारच आनंद वाटतो; आतां मुलाच्या बोलण्याला पिता इतका भुलतो, पण पित्याचें बोलणें मुलाला कोठें आवडतें! आवडत नाहीं. मना जरि न ये गुरूक्तिहि ह्मणे कटु प्रायशा. गुरूक्तिहि ह्म० बापाचें हित-

कारकही बोलणें जरी मुलाच्या मनास येत नाहीं आणि तें बोलणें प्रायशा कटु आहे असें जरी तो मूल ह्मणतो, तरी मुलाच्या बोलण्यास बाप भुलतो. (असा तिसऱ्या चरणाचा संबंध मागें लावला पाहिजे) अहो दयानिधे, अशा जनांच्या कथा तुह्मांपुढें किती सांगाव्या, आणि सांगितल्या तरी शोभावयाच्या नाहींत. सारांश आपण बाप, मी लेकरूं. माझे बोबडे बोल गोड मानून घ्या, "माझ्या बोबडिया बोला। चित्त द्यावें गा विठ्ठला" असें तुकारामानेंही ह्मटलें आहे ॥ २६ ॥

---

**अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार बा हे विधी, श्रुतिज्ञहि ह्मणे सदा स्तविल आमची केंवि धी। तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती, स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती ॥ २७ ॥**

तुह्मां सर्वेश्वराची स्तुति करण्याची शक्ति आह्मां किंचिज्ञ जीवांस कोठून असणार, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार बा हे विधी श्रुतिज्ञहि ह्मणे सदा श्रुतिज्ञ ह्म०, वेदवेत्ताही विधी–ब्रह्मदेव सदा ह्मणतो, हे भगवन्, तुझा महिमा अतर्क्य आहे ह्म० तर्कासही विषय नाहीं; मग वाणीस

कोठून? आणि हे तुझे गुणही फार ह्म० अनंत आहेत. भूमीचे परमाणु कदाचित् मोजवतील. पण ईश्वराचे गुण कोणाच्यानें मोजवले जाणार नाहींत. असें ह्मणून ब्रह्मदेवानेंही जेथें हात टेकले, तेथें स्तविल आमुची कवि धी. आह्मां मानवांची बुद्धि कशी स्तवील? स्तवूं शकणार नाहीं. परमेश्वराचा यथार्थ स्तव करण्याची शक्ति ब्रह्मदेवाला नाहीं, मग मानवी बुद्धीला कोठून असणार? असणार नाहीं हें खरें आहे. तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती. तथापि व्यास वाल्मीकादि कितीएक सज्जन यथामति स्तवुनि—आपल्या बुद्धिशक्तीप्रमाणें परमेश्वराचा स्तव करून, सन्मती झाले. ह्म० त्यांनीं परमेश्वराचा बराच स्तव केला, तस्मात् हे सन्मति आहेत अशा प्रकारें लोकांत सन्मती ह्मणून प्रख्यात झाले. यावरून तुला आह्मीही यथामति स्तवावें इतकें खरें. वास्तविक पाहिलें असतां तुझ्यासारखी बुद्धिशक्ति ज्यास असेल तोच तुझा यथार्थ स्तव करूं शकेल; पण, स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती. तुझा स्तव करण्याकरितां तुझ्या सारखे कवि या पृथ्वीवर कधीं जन्मणार आहेत? ह्म०कधीं उत्पन्न होतील ते होवोत. होणार नाहींतच असा भावार्थ ॥ २७ ॥

---

**निजस्तुति तुह्मां रुचे स्तविति त्यां वरें तर्पितां, नमस्कृतिपरां बरें स्वधन सर्वही अर्पितां। स्व-**

# भाव तुमचा असा विदित जाह-
# ला याचकां, करूं स्तव जसात-
# सा फळ नव्हे जना याच कां॥२८॥

तुह्मी स्तुतिप्रिय आहां इतक्यानेंच आमचें कार्य व्हावयाजोगें आहे, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. निजस्तुति तुह्मां रुचे. कोणीं कशीही तुमची स्तुति केली तरी ती तुह्मांस आवडते. त्यामुळें, स्तविति त्यां वरें तर्पितां. जे कोणी तुमची स्तुति करितात त्यांस तुह्मी वर देऊन तृप्त करतां. फार काय सांगावें, नमस्कृतिपरां बरें स्वधन सर्वही अर्पितां. अनन्यभावेंकरून तुह्मांस केवळ नमस्कार मात्र करणारे जे कोणी आहेत त्यांस बरें ह्म० चांगलें जें आपलें धन तें सर्वही देतां; इतके तुह्मी स्तुतीला लुब्ध आहां! स्वभाव तुमचा असा विदित जाहला याचकां. तुमच्या याचकांस ह्म० तुह्मांपाशीं नित्य याचना करणारे जे तुमचे सेवक त्यांस असा हा तुमचा स्वभाव ह्म० तुह्मांला निजस्तुति आवडते, आणि स्तुति करणाऱ्यावर तुह्मी लवकर प्रसन्न होतां, असा तुमचा स्वभाव विदित झाला. ह्मणून, करूं स्तव जसा तसा. जसा येईल तसा वेडावांकडा आह्मी स्तव करूं; मग तो तुह्मांस आवडेल. मग फळ नव्हे जना याच कां मग त्या स्तवाचें फळ इतरांप्रमाणें या जनाला ह्म० मला कां नव्हे—कां नाहीं होणार? अर्थात् होईलच होईल ॥ २८ ॥

---

तुह्मी परम चांगले बहु समर्थ दा-
ते असें, सुदीन जन मी तुह्मां
शरण आजि आलों असें । पु-
न्हाहि कथितों बरें श्रवण हें क-
रा यास्तव, समक्ष किति आपुला
सकललोकराया ! स्तव ॥ २९ ॥

---

मागल्या श्लोकांत कवि बोलला कीं, जसा येईल तसा स्तव मी करीन. तर तोच स्तव कवि करून दाखवितो. अहो देवा ! तुह्मी परम चांगले बहु समर्थ दाते. तुह्मीं सर्व गुणांनीं चांगले आहां, तसेच बहु समर्थ ह्म० सर्वशक्तिमान् आहां, आणि दाते ह्म० भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारे आहां. ही म्यां तुमची स्तुति केली. आतां मजकडील वृत्त कळवितों. असें सुदीन जन मी. मी फार दीन—अनाथ आहें. आणि ह्मणून, तुह्मां शरण आजि आलों. या काळीं मी तुमचा शरणागत आहें. हें तुह्मीं ऐकिलेंना ? ऐकिलें नसलें तर, असें पुन्हाहि कथितों. प्रथम मी तुमची स्तुति केली आणि मग मी आपली अवस्था निवेदिली, तीच फिरून कथितों. यास्तव, बरें श्रवण हें करा. हें माझें भाषण लक्ष लावून चांगलें ऐका. आपण ह्मणाल कीं, हा एवढाच का माझा स्तव ? तर, समक्ष किति आपुला सकललोकराया स्तव. हे सकललोकराया ह्म० हे त्रैलोक्याधीशा ! समक्ष ह्म० आप-

ल्या पुढें–आपल्या तोंडावर आपला स्तव किती ह्म० आणखी आपला स्तव किती करावा ? केला इतका पुरे. थोरांच्या तोंडावर फार स्तव करणें बरें नाहीं असें मला वाटतें ॥ २९ ॥

---

**किती श्रवण झांकिती प्रभुहि काय ते पोळती, पुसाल जरि कोण ते पदरजीं तुझ्या लोळती। बरें तुजचि सोसवे स्तवन कृत्तिवासा गरा, न पी तरि कसें घडे हितकरा! दयासागरा! ॥ ३०॥**

तोंडावर फार स्तव करणें नीट नाहीं असें जें मीं ह्मटलें याचें कारण इतकेंच कीं, किती श्रवण झांकिती प्रभुहि. कितीएक सत्पुरुष प्रभुही ह्म० स्तुतीस योग्य असतांही कोणी त्यांचा फार स्तव करूं लागल्यास ते श्रवण झांकिती ह्म० कानांवर हात ठेवितात; ते कां ठेवितात बरें ! काय ते पोळती ? तापलेली सळई कानांत शिरल्याप्रमाणें स्तुतिशब्दांनीं ते भाजतात काय ? ज्यापेक्षां ते कानांवर हात ठेवितात त्यापेक्षां त्यांस निजस्तुति सोसवत नाहीं असें समजलें पाहिजे. ह्मणून स्तुति करणारानें थोराची स्तुति समक्ष करणें तर थोडीच करावी; फार करूं नये. ज्यांस निजस्तुति आवडत

नाहीं असे कोण आहेत असें पुसाल तर सांगतों. ते पदरजीं तुझ्या लोळती. तुझ्या पदरजाच्या लाभानें कृतार्थ झाले असे जे तुझे सेवक ह्म० साधुजन तेच. त्यांस निजस्तुति आवडत नाहीं. तुह्मांला तर थोडी स्तुति पुरेशी होत नाहीं, पुष्कळ पाहिजे. यावरून शाबास तुमची. बरं तुजचि सोसवे स्तवन. तुझ्या भक्तांला स्तवन सोसवत नाहीं; पण तुला बरें सोसवतें बा! तूं धन्य आहेस. मला वाटतें हें स्तवन तूं सुखानें सोशीत नाहींस. हें तुला अवश्य सोसलेंच पाहिजे. स्तवन सोसल्यावांचून भक्तांचीं कार्यें कशीं होतील; पाहा, कृत्तिवासा गरा न पी तरि कसें घडे. हे हितकरा! हे दयासागरा! समुद्रांतून निघालेलें विष जेव्हां त्रैलोक्य जाळूं लागलें तेव्हां सर्व शिवास शरण गेले. मग शिवाला दया येऊन लोकांचें हित करण्याकरितां तें विष शिव प्याला. जर तो कृत्तिवासा ह्म० शिव गरा न पी ह्म० विषाला न पिता तर कसें घडे ह्म० लोकांचें हित कसें घडतें? तसें तुह्मीही भक्तहितेच्छु, भक्तवत्सल व दयासागर आहां; ह्मणून भक्तहिताकरितां तुह्मांला स्तवन सोसणें भाग आहे ॥ ३ ॥

---

**गमो मधुर हें विषस्तवन सेवितां माजवी, करी मलिन सद्यशोमुखहलाहला लाजवी। हरापरिस तूं बरा प्रभुवरा सदा जो**

## पिशी, असा रस समर्पित्या अ-
## मृत आपुलें ओपिशी ॥ ३१ ॥

स्तवनाच्या आंगीं दोष आहे खरा हें स्थापित हो-त्साता कवि ह्मणतो. गमो मधुर हें विष स्तवन. हें स्तवन मधुर गमो ह्मणजे कोणाला गोड वाटेल तर वाटो; पण केवळ विष आहे, ह्म० कडू असून मादक आहे. कशावरून ? तर पाहा, सेवितां माजवी. त्या स्तवनाचें सेवन केलें असतां तें सेवनकर्त्यास माजवितें ह्म० उन्मत्त करितें. जे स्तुतिप्रिय पुरुष असतात ते लोकांनीं केलेली निजस्तुति ऐकून गर्विष्ठ होतात. आणखी, तें स्तवनविष सेवनकर्त्यास माज आणितें, इतकेंच नाहीं; तर, करी मलिन सद्यशोमुख. उत्तम यश हेंच कोणी मुख त्याला मलिन करितें. उन्मत्त झाला ह्म० अपकीर्तीस पात्र होतो हें तात्पर्य. फार काय सांगावें ? हलाहला लाजवी. हलाहल ह्मणून जें प्रसिद्ध विष त्यालाही आपल्या मारक गुणानें हें लाजवितें ह्म० त्यापेक्षां हें अधिक मारक असा अर्थ. असें जें दुर्धर स्तवनविष तें जो तूं सदा पिशी ह्म० वारंवार प्राशितोस, तो तूं हरापरिस बरा. शिवापेक्षां फार चांगला असें ह्मटलें पाहिजे. कां कीं, महादेव एकवार मात्र विष प्याला, आणि तूं नेहमी पितोस, ह्मणून तुला हरापेक्षां बरा ह्मणतों. आणखी एक बरेपणा तुझ्या आंगीं चमत्कारिक आहे. तो हा कीं, असा रस समर्पित्या अमृत आपुलें ओपिशी. अशा प्रकारचा विषरस जो कोणी तुला समर्पितो ह्म० देतो त्याला तूं आपला अमृतरस देतोस, हा मोठा

चमत्कार होय. (श्लेषेंकरून अमृत शब्दाचा अर्थ मोक्ष समजावा.) सारांश, स्तुति तुह्मांला फार आवडते ह्मणून स्तुति ही तुमची प्रिया आहे असें ह्मणण्यास चिंता नाहीं ॥ ३१ ॥

---

**कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुती-
च्या पते! भले न वरिती स्तुति-
प्रति न जोडिती पाप ते। गळां
पडति ज्यांचिया तव गुणैकदेश-
भ्रमें, तिहीं तुजचि दावितां
भजति बा! तुला संभ्रमें॥३२॥**

स्तुतीला लक्ष्मीपणा देऊन तिचा तूं पति आहेस अशा अभिप्रायाचें कवि भगवंतास प्रथम संबोधन देऊन ह्मणतो. हे कवीश्वरमनःपयोनिधिसुतास्तुतीच्या पते! लक्ष्मी जशी समुद्राची कन्या तशी स्तुति ही कवीश्वर ह्म० श्रेष्ठकवि त्यांचें मन हाच समुद्र त्याची सुता ह्म० कन्या आहे. अत एव लक्ष्मीरूप जी स्तुति तिचा पति ह्म० भोक्ता तूंच आहेस ह्मणून; भले न वरिती स्तुतिप्रति. जे भले ह्म० थोर साधु ते स्तुतीला वरीत नाहींत. ते ह्मणतात ईश्वर आमचा बाप आहे, त्याची स्त्री जी स्तुति ती आमची आई झाली. तर तिचा अंगीकार कसा करावा? ह्मणून, न जोडिती पाप ते. ते भले पाप न जोडिती ह्म० स्तुतीचा स्वीकार करून पापांत पडत नाहींत.

यावरून जे स्तुतीची इच्छा करितात ते पाप जोड-तात हें सिद्ध. इतकेंही असून एकादे वेळेस ती स्तुति कोणा सत्पुरुषांच्या गळीं पडते, ती कशामुळें ? तर, तव गुणैकदेशभ्रमें. तुझ्या गुणांचा ह्म० क्षमादयादि-गुणांचा एकदेश ह्म० कांहीं अंश त्या सत्पुरुषाचे ठायीं तिला दिसून येतो, त्यामुळें तिला भ्रम होतो, कीं हाच माझा पति काय? अशामुळें ती स्तुति प्रथम ज्यांच्या गळां पडते, तिहीं तुजचि दाविता. त्या पुरु-षांनीं तुला दाखवून दिलें असतां, भजति बा! तुला सं-भ्रमें. मग ती तुझी तुजकडे जाऊन मोठ्या आदरानें तुझें सेवन करिते. तात्पर्य, या जगांत कोणी सत्पु-रुषाची स्तुति त्याच्या तोंडावर करूं लागला तर तो ह्मणतो, माझी स्तुति कशाला करतां, ईश्वराची करा; मी काय केलं आहे? सर्व ईश्वराच्या सत्तेनें घडत आ-हे. ह्मणून ही स्तुति ईश्वराकडे जाऊं द्या. मग तो स्तुति करणारा चुकूर होऊन ईश्वराचा स्तव करूं लागतो ॥ ३२ ॥

---

ह्मणोनि कवितासुता तुज समर्पि-तां साजरी, नसे बहु तशी गु-णी कनकपीतवासा! जरी। तरी न इतरा वरी हरि! करीं इला किं-करी, मयूरहि निजात्मजाग्रह-विमुक्त जैसा करी ॥ ३३ ॥

स्तुतीचा मुख्य भोक्ता ईश्वर असें ठरवून आणि स्तुतिप्रधान कविता ही कविरूप सागराची कन्या असें कल्पून आपली कवितारूप कन्या ईश्वरास अर्पावी अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करतो. ह्मणोनि कवितासुता तुज समर्पितों. हे भगवन्! स्तुतीचा भोक्ता तूंच आहेस ह्मणून ही माझी कवितासुता ह्म० स्तुत्यात्मक कवितारूप कन्या तुला अर्पितों; हिचें पाणिग्रहण करावें. हे कनकपीतवासा ह्म० सुवर्णासारिखा पीतांबर नेसणाऱ्या देवा! ही माझी कन्या जरी, साजरी नसे बहु, ह्म० फार सुंदर नाहीं, आणि तशी गुणी नसे, ह्म० असावी तशी गुणवतीही नाहीं; तरी, न इतरा वरी. तरी तुला सोडून दुसऱ्याला वरावयास इच्छित नाहीं. याकरितां, हे हरि! इला किंकरी करीं. इला आपली दासी कर ह्म० स्त्री कर असा अर्थ. येथें किंकरी शब्द अतिनम्रतासूचक घातला आहे. लक्ष्मीही ह्मणते मी हरीची दासी आहें. आणखी कवि ह्मणतो. मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त करीं. हा मयूर कविही निजकन्यारूप जो ग्रह ह्म० नक्र यापासून विमुक्त करा, ह्मणजे सोडवा. यास दृष्टांत. जैसा करी-जसा तो करी ह्म० गजेंद्र ग्रहविमुक्त केला ह्म० नक्रापासून सोडविला, तसें मला कन्यारूप नक्रापासून सोडवा. एकाद्याची कन्या उपवर झाली असतां आणि तिला वरही मिळेनासें झालें ह्मणजे तिच्या पित्यास मोठें संकट पडतें; आणि केव्हां हिला वर मिळेल आणि केव्हां तिचें दान करून मी मोकळा होईन असें त्याला होतें. तसें या कवीस झालें ह्मणून

त्यानें कन्येला ग्रह असें ह्मटलें; आणि लोकांतही अशी प्रवृत्ति आहे कीं, आपलें कार्य करून घेतल्याशिवाय जो ज्याला सोडीत नाहीं त्याला तो ग्रह ह्मणतो. संस्कृत भाषेत ग्रह किंवा ग्राह हें नक्राचें नांव आहे ॥ ३३ ॥

---

स्मरोनि कृतमंतुला न कवितावधूस्वीकृति, कराल तरि आयका प्रभु खराच मी दुष्कृती। नमस्कृतिपुरःसर स्वकृति अर्पितों आजि ती दिली रविसखें तुह्मां जशि नमूनि सात्राजिती ॥ ३४ ॥

माझे अपराध मनांत न आणितां माझ्या कन्येचा स्वीकार करावा अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करतो. स्मरोनि कृतमंतुला न कवितावधूस्वीकृति कराल. म्यां केलेले अपराध स्मरून ह्म० मनांत आणून जर माझ्या कविताकन्येचा स्वीकार आपण न कराल ह्म० करणार नाहीं, तर माझा उपाय नाहीं. पण, आयका. माझी प्रार्थना ऐका. हे प्रभू देवा! खराच मी दुष्कृती. मी अपराधी आहें खराच. याजकरितां, नमस्कृतिपुरःसर स्वकृति अर्पितों आजि. नमस्कारपूर्वक ह्म० तुह्मांस हात जोडून तुमच्या पायां पडून ही माझी कृति ह्म० कविताकन्या आज अर्पितों. मग तर ध्यावयास

चिंता नाहीं ना? अशा प्रकारचें उदाहरण मी तुह्मांस दाखवितों. ती दिली रविसखें तुह्मां जाशि नमूनि सात्राजिती. रविसख ह्म० सूर्याचा मित्र जो सत्राजित त्यानें तुह्मांवर स्यमंतक मणि चोरल्याचा आळ घातला होता; यामुळें तो तुमचा अपराधी होता. तरी त्यानें तुह्मांला हात जोडून ती सात्राजिती ह्म० आपली कन्या सत्यभामा जशी दिली, तशी मी नमून देतों. सत्राजिताचे अपराध विसरून सत्यभामेचा स्वीकार जसा तुह्मीं केला, तसा माझे अपराध विसरून माझ्या कन्येचा स्वीकार करा, असा भाव ॥ ३४ ॥

---

**पिता खळ परंतु ती गुणवती सती चांगली, ह्मणोनि मज आपुल्या भजानें लावणें लागली। ह्मणाल तरि तत्सुता कशि तुह्मांसवें भांडगा, अहर्निशिहि भांडला त्रिणवरात्र जो दांडगा ॥३५॥**

तुह्मी ह्मणाल कीं, सत्राजिताचें उदाहरण त्वां दाखविलें खरें, पण ती गोष्ट निराळी होती कशी तर, पिता खळ, परंतु ती गुणवती सती चांगली. पिता–सत्राजित खळ होता, ह्म० अपराधी होता खरा; परंतु ती सती–सत्यभामा त्याची कन्या गुणवती आणि सुंदरी होती. ह्मणोनि मज आपुल्या भजानें लावणें लागली.

यामुळें तिजवर दृष्टि देऊन ती म्यां आपल्या सेवेस लावून घेतली, ह्म० तिचा अंगीकार केला. तशी तुझी कन्या कोठें आहे? तूं अपराधी आणि तुझी कन्या ही साजरी नाहीं. ह्म० गुणी नाहीं असें तूंच सांगतोस; मग तुझ्या कन्येचा स्वीकार कसा करावा? असें ह्मणाल तर दुसरें उदाहरण दाखवितों. तत्सुता कशि. त्याची कन्या कशी स्वीकारिली? तो कोण, ह्मणाल तर सांगतों. जो, भांडगा दांडगा तुह्मांसवें त्रिणवरात्र अहर्निशिहि भांडला. जो जांबवान् भांडगा—भांडखोर आणि दांडगा—अमर्यादशील, असा असून तुह्मांबरोबर एकसारखा त्रिणवरात्र ह्म० सत्तावीस दिवसपर्यंत अहर्निशि ह्म० रात्रंदिवस भांडला ह्म० मल्लयुद्धानें लढला, त्याची कन्या जांबवती ही कुरूप असतां आणि तिचा बाप जांबवान् खळ ह्म० अपराधी असतांही जशी स्वीकारिली तशी माझी कन्या स्वीकारा. माझी कन्या जांबवती इतकी वाईट नाहीं आणि मीही जांबवानाइतका अपराधी नाहीं, असा भाव ॥ ३५ ॥

---

**तिलाहि बरवी ह्मणा उचित होय तोषाकरें, असेल सजली यथा-रुचि तयीं स्वयोषा करें। जशी पदरजें शिला परि असे न हे शापिली, धवें हरिमनोहराकृति सती अघें व्यापिली ॥ ३६ ॥**

जांबवतीचा स्वीकार केला तसा माझ्या कवितावधूचा स्वीकार करण्यास तुह्मांला कांहीं अडचण नाहीं, अशा अभिप्रायानें पुन्हा कवि ह्मणतो. तिलाहि बरवी ह्मणा. जांबवती जरी कुरूप होती तरी शेवटीं चांगली असें तिला तुह्मी ह्मटलें हें उचित होय; हें तुह्मांस योग्यच आहे. वाइटाचा अंगीकार करून त्याला चांगलें म्हणणें हें थोरांस योग्यच आहे. केवळ तोंडानेंच तिला चांगली म्हटलें असें नाहीं; तर तिच्या आंगीं खरोखरी चांगुलपणा तुह्मी आणिला. तोषाकरें असेल सजली यथारुचि तयीं स्वयोषा करें. तोषाकर ह्म० आनंदाची खाण अशा तुवां तयीं ह्म० जांबवतीचें ग्रहण केलें त्यासमयीं स्वयोषा ह्म० आपली स्त्री झाली जी जांबवती ती करें ह्म० आपल्या हस्तस्पर्शानें यथारुचि ह्म० मनाच्या आवडीसारखी सजली असेल ह्म० रूपवती केली असेल. ( येथें सजणें धातु सकर्मक समजावा. सजली ह्म० सजविली असा अर्थ. ) तिला मानवीरूप देऊन सुंदरी केली असेल असें तात्पर्य; वाइटाचें चांगलें करणें तुह्मांला कठीण नाहीं अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. जशी पदरजें शिला. रामावतारीं पायांच्या रजाच्या स्पर्शानें शिला ह्म० धोंड जशी मानवी स्त्री केली. गौतममुनीची भार्या अहल्या इंद्राशीं व्यभिचार घडल्यामुळें गौतमानें शाप देऊन शिला करून टाकिली होती ती शिला जशी तुह्मी चांगली केली, तशी माझी कन्या तुह्मी चांगली करून घ्या. परि—परंतु आणखी एक विशेष सांगतों. असे न हे शापिली, धवें हरिमनोहराकृति सती अर्धे व्यापिली. अहल्या सती म्ह० साध्वी

आणि हरिमनोहराकृति ह्म० इंद्राचें मन हरणारी अशी होती. तशीच माझी कन्या सती आणि हरिमनोहराकृति आहे; ( येथें हरि शब्दानें विष्णु समजावा ) परंतु धवें शापिली, आणि अधें व्यापिली, अशी मात्र नाहीं. ह्मणून हिला नीट करावयास तुह्मांला फारसें जड पडवयाचें नाहीं, असा भाव ॥ ३६ ॥

---

**भलें स्मरण जाहलें समयिं कंसदासी करें, कशी उजरली समुज्ज्वलदयासुधासीकरें । तुह्मां स्वरिपुची तशी बटिक आवडे मत्कृती, नको न सजवे असा बहुत काय मी दुष्कृती ॥ ३७ ॥**

वाईट होती ती चांगली केली याविषयीं तिसरें उदाहरण दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. भलें स्मरण जाहलें समयिं. योग्य समयावर स्मरण चांगलें झालें. कशाचें स्मरण झालें ह्मणाल तर, कंसदासी करें कशी उजरली समुज्ज्वलदयासुधासीकरें. समुज्ज्वल ह्म० अतिस्वच्छ जी दयासुधा—दयामृतरस त्याचे सीकर ह्म० कण अर्थात् वृष्टि ज्यापासून होते अशा तुवां किंवा अशा करें—आपल्या हातानें कंसदासी कंसाची दासी जी कुब्जा ती त्रिवक्रा असतां कशी उजरली—कशी सरळ केली ! तशी माझी कृति वक्र असली तर सरळ करा.

कुरूप असली तर सुरूप करा, विशोभित असली तर सुशोभित करा; पाहिजे तशी करून घ्या, पण एकदां घ्या ह्मणजे झालें. कदाचित् तुह्मी ह्मणाल कीं, असलीं हीं कामें आह्मी करीत बसावें कीं काय? आह्मांला तुझी कन्या नको आणि आमच्यानें तिला नीटही करवत नाहीं.. तर आपणास मी असें पुसतों कीं, तुह्मां स्वरिपुची तशी बटिक आवडे. तुह्मां—लक्ष्मीकांताला प्रत्यक्ष आपल्या शत्रूची बटिक—दासी तीही वेडीविद्री आवडली आणि माझी कृति ह्मणजे कवितावधू नको ह्मणतां आणि सजवत नाहीं ह्मणतां तर; असा बहुत काय मी दुष्कृती. असा मी मोठा पापी ह्म० अपराधी आहें काय? तुह्मी माझ्या कन्येचा स्वीकार करूं नये असा मोठा अपराध मजकडून कोणता घडला तो सांगा, असा भाव ॥ ३७ ॥

---

जशी पृथुकतंदुलप्रसृति आप्तकामा तशी, रुचो कृति सभाग्य तूं सुनय आप्त का मातशी। कण्या विदुरमंदिरीं ह्मणति साधु आस्वादिल्या, खरें जरि कशा तुज प्रभुसि आपुल्या स्वा दिल्या॥३८॥

भक्तानें मनोभावें करून कसाही पदार्थ तुह्मांस अर्पिला असतां त्यानें तुह्मांस संतोष होतो, हें

दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. जशी पृथुकतंदुलप्रसृति आप्तकामा तशी रुचो कृति. आप्तकाम ह्म० पूर्णकाम असा जो तूं त्या तुला जशी—ज्याप्रमाणें पृथुकतंदुलप्रसृति ह्म० सुदाम्यानें भक्तिपूर्वक दिलेल्या पोह्यांची मूठ रुचली ह्म० आवडली. तशी—त्याप्रमाणें माझी कृति ह्म० कवितावधू रुचो—आवडो. तुमच्या योग्यतेप्रमाणें जरी हें माझें देणें नाहीं तरी, सभाग्य तूं सुनय आप्तका मातशी. तूं जरी सभाग्य—भाग्यवान् ह्म० श्रीमंत आहेस तरी सुनय—नीतिमान् आणि आप्त—हितकर्त्ता आहेस, ह्मणून हें माझें अल्प देणें घ्यावयास काय माजशील? माजणार नाहींस. भक्तानें भक्तिपूर्वक दिलेलें तुह्मी मोठ्या आवडीनें स्वीकारितां अशी तुमची ख्याति आहे. याविषयीं ऐकण्यांत आहे कीं, कण्या विदुरमंदिरीं ह्मणति साधु आस्वादिल्या. साधु ह्मणतात कीं, देवानें विदुराच्या घरीं जोंधळ्यांच्या कण्या भक्षिल्या. खरें जरि कशा तुज प्रभुसि आपुल्या स्वादिल्या. ही गोष्ट जर खरी असेल तर मला वाईट वाटतें कीं, आपला स्व ह्म० आत्मा, प्राणप्रिय, निजधन, आप्त, असा जो तूं प्रभु त्या तुज प्रभुला तसल्या कण्या विदुरानें कशा दिल्या? तुह्मी विदुराच्या घरीं कधीं नव्हते गेलां. तर त्यानें तुह्मांला पंचपक्वान्नाचें भोजन द्यावयाचें होतें, तें सोडून कण्या खावयास दिल्या हें आश्चर्य, आणि तुह्मीही त्या आवडीनें भक्षिल्या हें त्याहून आश्चर्य. तस्मात् भक्तार्पित तुह्मांस फार आवडतें हेंच खरें. तर माझें अर्पणही तसेंच तुह्मांस आवडो, असा भाव ॥ ३८ ॥

---

**जिणें रस पहावया प्रशिथिलीं र-**
**दीं चाविलीं, सुवासहि कळावया**
**प्रथम नासिकीं लाविलीं । तुह्मां-**
**सि शबरी तशीं बदरिकाफळें दे-**
**जुनीं, कथा अशि असो पहा स्व-**
**चरितें तुह्मी मेजुनी ॥ ३९ ॥**

भक्तार्पित पदार्थ देवाला फार आवडतो, याविषयीं शबरीचें उदाहरण दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. जिणें रस पहावया प्रशिथिलीं रदीं चाविलीं. ज्या शबरीनें माझा राम भुकेला असेल त्याला मी चांगलीं चांगलीं बोरें वेंचून नेऊन देईन असें मनांत आणून बोरें तोडलीं आणि रस आंबट गोड पहावयाकरितां प्रशिथिलीं रदीं चाविलीं ह्म० ह्मातारपणामुळें शिथिल झालेल्या दांतांनीं चावलीं. आणि, सुवासहि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं. त्या बोरांचा सुवास कळण्याकरितां अगोदर नाकालाही तीं लाविलीं. तुह्मांस शबरी तशीं बदरिकाफळें दे. तशीं ह्म० नाकास लावलेलीं आणि दांतांनीं चावलेलीं बदरिकाफळें ह्म० बोरें ती शबरी तुह्मांस देती झाली, आणि तीं बोरें तुह्मी मोठ्या आवडीनें भक्षिलीं. ही जुनी कथा; ह्म० रामावताराची प्राचीन कथा अशी आहे. ही उदाहरणाकरितां एक सांगितली. ही असो, ह्म० राहूंद्या. अशा कथा पुष्कळच आहेत. पहा स्वचरितें तुह्मी मेजुनी. तुमचीं चरित्रें तुह्मीच मोजून पाहा.

ग्यां पामरानें किती वर्णावीं; सारांश त्या बोरांपेक्षां तर माझी कवितावधू वाईट नाहींना ! असा भाव ॥ ३९ ॥

---

**प्रभो ! शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे, ह्मणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे । प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा ! खरें, घनांबु न पडे मुखीं उघडि-ल्याविना पांखरें ॥ ४० ॥**

भक्तांवर ईश्वराचा प्रेमा फार असतो हेंच दृढ करीत होत्साता कवि ह्मणतो. प्रभो शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे. हे प्रभो ! जो कोणी तुह्मांस अनन्यभावानें शरण आला त्यावर ह्म० त्याविषयीं तुह्मी कधीं वांकडे होत नाहीं, ह्म० त्याचे मनोरथ पूर्ण करण्याविषयीं कधीं प्रतिकूळ होऊन उपेक्षा करीत नाहीं हें सत्य आहे, ह्मणोनि इतुकेंच हें स्वहितकृत्य जीवांकडे. असें आहे ह्मणून जीवांकडे. ह्म० जीवदशेस पावलेल्या मनुष्यादिप्राण्यांकडे आपल्या हिताचें कृत्य—कर्तव्यकर्म हें इतकेंच आहे कीं, तुह्मांला अनन्यभावानें शरण जावें. मग, प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा खरें. शरण आल्यावर प्रसाद करावयास तुह्मी पळमात्र विलंब करीत नाहीं. ह्म० उशीर लावीत नाहीं हेंही बापा देवा ! खरेंच आहे. आह्मां जीवांकडून मात्र शरण जा-

ण्याचा विलंब आहे. आह्मी शरण गेलों नाहीं तर तुह्मी तरी काय कराल? यास दृष्टांत.—घनांबु न पडे मुखीं उघडिल्या विना पांखरें. चातक पक्ष्याची तृषा दूर करणें मेघाला कांहींच कठीण नाहीं. जो सर्व जगाची तृषा क्षणांत दूर करणारा त्याला चातकाची तृषा शांत करणें ह्मणजे पदार्थ काय? परंतु त्या पांखरानें तोंड उघडल्यावांचून त्याच्या तोंडांत पर्जन्याचें उदक कसें पडेल? पडणार नाहीं. तसेंच शरण गेल्यावांचून ईश्वराचा प्रसाद मिळावयाचा नाहीं ॥ ४० ॥

---

**शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण, प्रभो चुकतसों तरी करिशि तूंचि संरक्षण। नसेचि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती, रुचे विषय ज्या मिळे अमृत ते न मद्या पिती॥ ४१ ॥**

हे प्रभो! तुह्मी माझी उपेक्षा करतां, तुह्मी मजवर दया करीत नाहीं असें जें मी तुह्मांस बोललों हें व्यर्थ आहे. ही माझी चुकी आहे, याचा दोष मजकडेसच आहे. तुह्मांकडे कांहीं नाहीं, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण. अदयता—निर्दयता ह्मणून जो दोष तो तुझ्या पायांला क्षणमात्रही स्पर्श करीत नाहीं. पायां-

ला नाहीं मग आंगाला कोठून असें तात्पर्य. ईश्वर निर्दय आहे असा शब्द तुह्मांला कोणाच्यानें कधींही ठेवतां यावयाचा नाहीं; कारण कीं, प्रभो चुकतसों तरी करिशी तूंचि संरक्षण. आह्मी जीवच वारंवार चुकतों; तुझी दया आह्मांकडे वळवी असें कृत्य आह्मी करीत नाहीं. तरी तूं आमचें संरक्षण करितोस, तेव्हां तुला निर्दय कोण ह्मणेल? तूं सदयच आहेस; परंतु त्या दयेचा लाभ आह्मांस कां होत नाहीं याचें कारण पाहतां असें दिसतें कीं, नसेचि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती. अद्यापि आह्मांकडून ती शरणागती ह्म० जशी व्हावी तशी शरण जाण्याची क्रिया घडली नाहीं, हेंच सत्य. कारण कीं, रुचे विषय. स्त्रीपुत्रादि विषय आह्मांस गोड वाटतात. जो ईश्वरास शरण गेला त्यानें विषयाचें तोंड पाहूं नये असें घडलें तर शरणागती खरी. तुह्मी ह्मणाल कीं, तर मग विषयांचा त्याग कां करीत नाहीं. तर असें आहे; ज्या मिळे अमृत ते न मद्या पिवी. ज्याला अमृत मिळालें ते मद्य पीत नाहींत. अर्थात् ज्यांला अमृत मिळत नाहीं तेच मद्य पितात. तसें तुमच्या दर्शनामृताचा लाभ नाहीं ह्मणून विषयरूप मद्याकडे मन धांवतें, हें तात्पर्य ॥ ४१ ॥

---

**विपाक न गणोनि म्यां प्रकट आपुल्या घातकें, कळोनि अमितें बळें विविध जोडिलीं पातकें ।**

**क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि ऐसें तुला, ह्मणें नमुनियां सुदुस्तरविपन्नदीसेतुला ॥ ४२ ॥**

स्त्रीपुत्रादि तुच्छ विषयांवर आसक्त झाल्यामुळें बुद्धीस इतका भ्रम झाला कीं, विपाक न गणोनि म्यां प्रकट आपुल्या घातकें. मी जीं कर्मे करतों त्यांचा परिणाम पुढें काय होईल याची गणना न करितां ह्म १ हें मनांत न आणितां स्पष्ट जो मी आपला घातक—आपला नाश करून घेणारा आत्मघातकी यानें, कळोनि अमितें बळें विविध जोडिलीं पातकें. जाणून बुजून नानाप्रकारचीं असंख्य पातकें केलीं. याचा मला आतां पश्चात्ताप झाला ह्मणून, सुदुस्तरविपन्नदीसेतुला तुला नमुनियां हे भगवन्! *क्षमस्व अहं अजामिलसखोऽस्मि ऐसें ह्मणें. अत्यंत दुस्तर अशी विपत्तिरूप—दुःखरूप नदी ती उतरून जाण्यास सेतूसारखा जो तूं त्या तुला नमुनियां ह्मणजे नम्र होऊन अर्थात् शरण येऊन ह्मणतों कीं, हे भगवन्—हे परमेश्वरा ! माझ्या सर्व पातकांची—सर्व अपराधांची क्षमा कर. मी अजामिळाचा सखा ह्मणजे सोबती आहें, अर्थात् तत्तुल्य पापी आहें. त्याचा जसा उद्धार केला तसा माझा करा. जर या समयीं उपेक्षा कराल तर मी या विपत्तिनदींत बुडेन, असा भाव ॥ ४२ ॥

---

* क्षमस्व भगवन्नजामिलसखोऽस्मि इतके शब्द संस्कृतभाषेंतले कवीनें येथें घातले आहेत.

नव्हे अनृत सत्य तें अचल ऊ-
चलीला करें, तुवां हरिमदापहें
बृहदुदारलीलाकरें । समुद्धरसि
एकटा जरि जडासि या कर्दमीं,
ह्मणेन भुवनत्रयीं तरि तुला भ-
ला मर्द मीं ॥ ४३ ॥

तुह्मी पूर्वी मोठमोठे पराक्रम केले, पण परीक्षेची वेळ आतां आहे. अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. नव्हे अनृत सत्य तें अचल ऊचलीला करें तुवां हरिमदापहें बृहदुदारलीलाकरें. बृहदुदारलीलाकरें हरिमदापहें तुवां करें अचल उचलिला तें सत्य, अनृत नव्हे. मोठ्या आणि उदार हितकारक अशा लीलांचा आकर—मुख्य स्थान अशा, आणि हरिमदापहें ह्म० इंद्राचा गर्व दूर करण्यास इच्छिणाऱ्या अशा, तुवां करें—आपल्या हातानें एकट्यानें अचल ह्म० गोवर्धनपर्वत उचलिला ही गोष्ट खरी आहे, खोटी नव्हे. त्या वेळेस तुह्मांला शाबासकी मिळाली असेल; पण या समयीं, समुद्धरसि एकटा जरि जडास या कर्दमीं. या विपत्तिकर्दमामध्यें जो मी हा जड पडलों आहें यास जर एकटा उद्धरशील ह्मणजे बाहेर काढशील तर, ह्मणेन भुवनत्रयीं तरि तुला भला मर्द मीं. मी तुला भुवनत्रयामध्यें तूंच एक मर्द—पराक्रमी आहेस असें ह्मणेन. कां कीं, खोल चिखलांत पडलेला जड पदार्थ जो कोणी एकटा जा-

ऊन बाहेर काढतो त्यालाच लोक शाबासकी देतात. जर तुह्मांला मजपासून शाबासकी मिळवावयाची असेल तर माझा लवकर उद्धार करा, असा भाव ॥ ४३ ॥

---

**चिकित्सक भला भला ह्मणुनि फार वाखाणिला, जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला। तथापि अतिदुःसहस्वगदशत्रुच्या अत्यया, विना न ह्रदयीं धरी सरुज पामर प्रत्यया ॥ ४४ ॥**

तुह्मी ह्मणाल कीं, मी असंख्य जडांचा उद्धार केला आहे आणि सर्व जग मला पराक्रमी ह्मणत आहे. तुझी कथा काय! तर सर्व जग तुह्मांला पराक्रमी ह्मणत असेल तर असो; पण मी ह्मणणार नाहीं. याविषयीं तुह्मांस लोकांतील दृष्टांत सांगतों ऐका. चिकित्सक भला भला ह्मणुनि फार वाखाणिला. चिकित्सक ह्म० कोणी वैद्य तो चांगला चांगला ह्मणून लोकांनीं फार वाखाणला–वर्णिला आणि त्या वाखाणण्याप्रमाणें त्या वैद्यानें, जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला. बहुत लोकांचा आमयद्रुम ह्म० रोगरूप वृक्ष समूळ खणून टाकला ह्म० लोकांचे रोग दूर केले. तथापि अतिदुःसह स्वगदशत्रुच्या अत्यया विना. अतिदुःसह जो आपला रोगरूप शत्रु त्याच्या ना-

शावांचून ह्म० आपला रोग त्यानें काढल्यावांचून, न ह्रदयीं धरी सरुज पामर प्रत्यया. तो रोगपीडित पामर ह्मणजे नीचस्वभावाचा हलका मनुष्य आपल्या ह्रदयांत प्रत्यय धरीत नाहीं ह्म० हा वैद्य चांगला आहे असें मानीत नाहीं. जो सुज्ञ आहे तो लोकांच्या अनुभवावरून वैद्यास चांगलें मानितो. पण जो पामर आहे तो आपणास अनुभव आल्यावांचून वैद्यास चांगलें मानीत नाहीं. तसेच मला अनुभव आल्यावांचून मी तुह्मांस पराक्रमाविषयीं शाबासकी देणार नाहीं, असा भाव ॥ ४४ ॥

---

**ह्मणा मज उताविळा गुणचि घेतला घाबरें, असो मन असेंचि बा भजकबर्हिमेघा ! बरें । दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें, धरील मन आधिनें बहु परिभ्रमे चाकसें ॥ ४५ ॥**

क्रमाक्रमानें तुझाही उद्धार होईल. तूं इतका उतावळा कां झालास? असें ह्मणाल तर, ह्मणा मज उताविळा. तुह्मी मला उतावळा ह्मणणार तर ह्मणा. हा तुह्मी माझा दोष काढला असें मी मानीत नाहीं, मी ह्मणतों कीं, गुणचि घेतला. हा तुह्मी माझा गुणच घेतला असें मी समजतों. कां कीं, घाबरें असो मन

असेंची वा भजकबर्हिमेघा वरें. वा भजकबर्हिमेघा! ह्म० हे भक्तमयूरांस आनंदविणाऱ्या मेघा, स्वोद्धाराविषयीं मन असेंच घाबरं ह्म० उतावळें असावें हें बरें. कां उतावळें असावें ह्मणाल तर, दिसे क्षणिक सर्व हें. हें सर्व जग क्षणिक दिसतें. क्षणांत या जगाची काय अवस्था होईल कोण जाणे! यावरून हें जीवित ज्या पक्षीं क्षणभंगुर आहे त्यापक्षीं, हें मन घडीचा भरंवसा कसें धरील! जेथें क्षणभर टिकण्याचा भरंवसा धरवत नाहीं तेथें घटकाभर टिकण्याचा भरंवसा कोणी धरावा. असें जें माझें मित्र मन तें, आधिनें बहु परिभ्रमे चाकसें. आधिनें ह्म० दुःखानें चाकासारखें फारच भ्रमण पावत आहे. त्याला स्थिरता नाहीं. ह्मणून मी प्रार्थना करतों कीं, क्षणाचा विलंब न करितां येऊन माझा उद्धार करावा ॥ ४५ ॥

---

**कृतांतकटकाऽमलध्वजजरा दिसों लागली, पुरःसरगदा सवें झगडतां तनू भागली । सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा, नहों जरि उताविळा स्वरिपु कापितो हा गळा ॥ ४६ ॥**

इतकी त्वरा करावयास कां सांगतों ह्मणाल तर, कृतांतकटकाऽमलध्वजजरा दिसों लागली. कृतांत ह्म० यम

त्याचें कटक-सैन्य तत्संबंधी जो अमल ध्वज ह्म० पांढरें निशाण तीच ही जरा ह्म० वृद्धत्वामुळें आलेली केशांस पांढुरकी ती दिसों लागली. सेनेचें निशाण दिसूं लागलें, यावरून सेनानायक जवळ आला असें अनुमान केलें पाहिजे. ती अमलध्वजजरा कशी आहे तर, पुरःसरगदा अग्रभागीं आहेत गद ह्म० रोग जिच्या अशी आहे. सर्वे झगडतां तनू भागली. त्या बिनीवाल्यांबरोबरच युद्ध करतां करतां माझी तनु भागली ह्म० रोगांचें सहन करतां करतां थकली. तर अशा प्रसंगीं, सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा. बळानें अधिक असा तुजवांचून दुसरा कोणी मला सहाय नाहीं, ह्म० मदत करणारा कोणी नाहीं. ह्मणून मी तुह्मांस धांवा धांवा ह्मणतों. न हो जरि उतावळा स्वरिपु कापितो हा गळा. अजूनही जर मी उतावळा न होईन तर स्वरिपु ह्म० हा काळ माझा गळा कापितो-माझा प्राण घेतो. काळाच्या हातीं मीं सांपडल्यावर तुमच्या पायांचें दर्शन मला कोठून होणार ह्मणून उपेक्षा करण्याची ही वेळ नव्हे असें ह्मणतों ॥ ४६ ॥

---

अवश्य करणें खरें प्रणतरक्षण स्वोचित, उशीर मग कां बसों कृपण मीहि कां शोचित। नव्हे प्रभुवरा तुह्मां उचित एकटें धां-

# वणें, कृतांत शिवला नसे तंव दिसे बरें पावणें ॥ ४७ ॥

हा अणीबाणीचा प्रसंग आहे. येथें हयगय करणें नीट नाहीं; असें सुचवीत होत्साता कवि प्रार्थना करितो. अवश्य करणें खरें प्रणतरक्षण स्वोचित. आपल्या प्रभुत्वास उचित ह्म० योग्य जें प्रणतरक्षण ह्म० शरणागताचें संरक्षण, तें तर अवश्य करणें खरें ह्म० तें तर केलेंच पाहिजे; केव्हां तरी करावयाचें, उशीर मग कां. मग यावयास उशीर कां करतां? आणि, बसों कृपण मीहि कां शोचित म्या गरीबानें तरी तुमची वाट पाहात, रडत, शोक करीत, ह्म० चिंता करीत कां बसावें? तुह्मी ह्मणाल कीं, ऐन्या वेळेस येऊन मी तुझा उद्धार करीन. तर, नव्हे प्रभुवरा तुह्मां उचित एकटें धांवणें. तुह्मी प्रभुवर-श्रीमंत आहां; तुह्मांला एकटें धांवत येणें उचित नाहीं-योग्य नाहीं, ह्म० शोभणार नाहीं. मजकरितां तुह्मी धांवत आलां तर तुह्मांला फार श्रम होतील, याचा मला खेद वाटतो. तुह्मी एकटे आलां तर चिंता नाहीं, पण धांवत याल त्यापेक्षां, कृतांत शिवला नसे तंव दिसे बरें पावणें. काळानें मला गांठलें नाहीं तोंपर्यंत अगोदर मजप्रत पावावें ह्म० माझें सहाय करावें हें बरें दिसतें. काळानें स्पर्श केल्यावर मग गडबडीनें धांवत याल त्यापेक्षां अगोदर सावकाशीनें आलां असतां तुह्मांस श्रम होणार नाहींत, असें तात्पर्य ॥ ४७ ॥

---

**कसें तरि करूं तुझें अवन पूरवूं आळ जी, असेल मनिं आमुचा तुज कशास रे काळजी । असें ह्मणि ह्मणाल हो प्रियतमा जगज्जीवना ! तदाश्रितमृगासि ती सुखसमृद्धि बा! जी वना ॥ ४८ ॥**

मज दीनाकरितां तुह्मां समर्थास श्रम पडूं नयेत असें माझ्या मनांत आहे; पण तुह्मी कदाचित् ह्मणाल कीं, कसें तरि करूं तुझें अवन. आह्मीं धांवत येऊं किंवा सावकाश येऊं; तुझें रक्षण कसें तरी करूं. आणि, पुरवूं आळ जी असेल मनिं. तुझ्या मनांत जी आळ ह्मणजे इच्छा असेल तीही पुरवूं ह्म० पूर्ण करूं- पण, आमुचा तुज कशास रे काळजी. आमची काळजी तुला कशासाठीं ? आह्मांला श्रम होतील ही काळजी तूं कां करतोस ? असें ह्मणि ह्मणाल हो. देवा ! असें तुह्मी ह्मणाल हो एकादें; पण असें ह्मणूं नका. हे प्रियतमा, हे जगज्जीवना ! तुह्मी मला प्राणापेक्षां प्रिय आणि जगाचें जीवन आहां. तुमची काळजी अवश्य केली पाहिजे. कां कीं, तदाश्रितमृगासि ती सुखसमृद्धि बा जी वना. जी वनास सुखसमृद्धि ती तदाश्रित मृगांस. अरण्यांत जर तृण, जल, तरुच्छाया यांची समृद्धि असली तर ती अरण्याच्या आश्रयास राहणाऱ्या पशूंस मिळते. आणि जर तें अरण्यच

ओसाड पडलें तर त्या पशूंस सुख कोठून मिळणार? तसें, जर तुह्मी सुखी तर आह्मी सुखी; तुह्मांला कष्ट झाले तर आह्मांला सुख कोठून मिळणार? असें आहे, ह्मणून तुमची आह्मांला काळजी करणें भाग आहे असें तात्पर्य ॥ ४८ ॥

---

**सुखेंचि सुख बाळका प्रकट होय मातेचिया, तिला घडति जे श्रम प्रियजनोत्तमा! तेचि या। ह्मणोनि न शिवो पळ क्षणहि कष्ट जीवा तुला, विपज्जलधिसेतुला सकललोकजीवातुला ॥ ४९ ॥**

आश्रयाला जें सुखदुःख तेंच आश्रिताला; असें मागच्या श्लोकांत सांगितलें, तेंच दुसऱ्या दृष्टांतानें दृढ करीत होत्साता कवि प्रार्थना करतो. सुखेंचि सुख-बाळका प्रकट होय मातेचिया. मातेच्या सुखानेंच बाळकाला सुख प्राप्त होतें ह्म० माता सुखी असली तरच तिच्या मुलाला सुख प्राप्त होतें, हें प्रकट ह्म० प्रसिद्ध आहे. हे प्रियजनोत्तमा—प्रियजनांमध्यें श्रेष्ठा देवा! तिला घडति जे श्रम तेचि या. मातेला जे श्रम—कष्ट घडतात तेच या—याला ह्म० तिच्या मुलाला घडतात. या दृष्टांतावरून कवि सुचवितो कीं, देवा तुमच्या सुखानें आह्मी सुखी आणि तुमच्या दुःखानें आह्मी दुःखी. ह्मणोनि हे

जीवा, तूं आमचा जीव आहेस ह्मणून तुला कष्ट पळभरही, किं बहुना क्षणभरही न स्पर्श करोत. तूं कसा आहेस? विपज्जलधि सेतुला. विपत्तिसमुद्र तरून जाण्यास सेतूसारखा; आणि, सकललोकजीवातुला. सकल लोकांचा जीवातु ह्म० जीवनदात्या अशा तुला कष्ट न पडोत. तुला कष्ट ते आह्मांला कष्ट याजकरितां तुझी काळजी आह्मी करितों ॥ ४९ ॥

---

असोत तुज आमुचीं सकल भावुकायुर्बळें, जगोनि बहु काय म्यां सुकृत जोडिलें दुर्बळें। असें प्रियसख्या! सुखी बहुत काळ मा-यातमीं, जनां सुपथ दाखवीं मुदित सत्तमा यांत मी ॥ ५० ॥

तुला कष्ट पडूं नयेत इतकीच काळजी आह्मीं करतों असें नाहीं; तर त्वां चिरकाळ सुखी असावें असेंही इच्छितों, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. असोत तुज आमुचीं सकल भावुकायुर्बळें. आह्मां सकल भावुकांचीं—भक्तांचीं आयुर्बळें अर्थात् जीं अवशिष्ट आयुष्यें तीं सारीं तुला असोत. आयुष्याला कां कंटाळलास असें ह्मणाल तर, जगोनि बहु काय म्यां सुकृत जोडिलें दुर्बळें. म्यां दुर्बळानें इतके दिवस जगून कोणतें सुकृत जोडलें. ह्म० परमार्थसाधनाचें कृत्य कोणतें केलें? कोण-

तेंच केलें नाहीं. यापुढें जगून तरी काय करणार आहे? ह्मणून आमचीं आयुष्यं तुला असूंदे, असें ह्मणतों. आणखी, असं प्रियसख्या सुखी बहुत काळ. हे प्रियसख्या देवा! तूं बहुतकाळ–चिरकाळ सुखी ऐस; आणि, मायातमीं जना सुपथ दाखवीं. अज्ञानरूप अंधकारांत जे जन भ्रमत आहेत त्यांस उत्तम मार्ग दाखीव. मुदित सत्तमा यांत मी. अशा गोष्टींत मी फार संतुष्ट आहें. हें कवीचें सलगीचें भाषण लोकरीतीस अनुसरून आहे ॥ ५१ ॥

---

**भले परिशिले सुरासुरनरीं तसे लक्ष मीं, ह्मणोत ह्मणणार बा! तुज असा नसेल क्षमी। उरीं भृगुपदाहती मिरवितोसि अद्यापि ती, कवी तव यशःकथा नवसुधानवद्या पिती ॥ ५१ ॥**

जरी आह्मी मर्यादा सोडून इतकें लडिवाळपणानें बोलतों तरी तूं तें ऐकून घेऊन आमची क्षमा करतोस; तर तुझ्यासारखा क्षमाशील तूंच, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. भले परिशिले सुरासुरनरीं तसे लक्ष मी ह्मणोत ह्मणणार. सुर, असुर, व नर यांजमध्यें तसे भले ह्म० क्षमावंत लक्षावधि मीं ऐकिले आहेत असे कोण ह्मणणार असतील ते

ह्मणोत; परंतु बा तुज असा नसेल क्षमी. बा देवा! तुजसारखा तूंच आहेस. कशावरून? पहा, उरीं भृगु· पदाहती मिरवितोसि. भृगु ब्राह्मणानें तुझ्या उरावर लाथ मारिली हा त्यानें लहान अपराध केला काय? मोठाच केला; तथापि त्याची क्षमा करून उलटें महाराज! आपला पाय दुखवला असेल असें त्या ब्राह्मणास विनयानें बोलून त्याच्या लाथेची जी खूण तुझ्या उरावर उमटली ती भूषण ह्मणून लोकांत मिरवितोस. त्याच खुणेला "श्रीवत्स" असें नांव ठेवून श्रीवत्सलांछन असें आपणास ह्मणवून घेतोस. ही तुझ्या क्षमेची पराकाष्ठा झाली. ह्मणूनच, अद्यापि ती कवी तव यशःकथा नवसुधानवद्या पिती. नवसुधेप्रमाणें अनवद्य ह्म० स्तुत्य आणि स्वच्छ जी तुझ्या यशाची कथा ती अद्यापि कवि ह्म० पंडितजन पिती ह्म० प्रीतीनें ऐकतात. येथें कवीनें 'सुधा'शब्द द्व्यर्थ घातला आहे. सुधा ह्म० अमृत किंवा सुधा ह्म० चुना. हे दोन्ही पदार्थ पांढरे आहेत. ह्मणून नवसुधेसारखी यशःकथा पांढरी स्वच्छ असें ह्मटलें ॥ ५१ ॥

---

भवन्मतिस आवडे जरि धना-
दिकांलागि ते, मदीय गुणकीर्त्त-
नश्रवण कां तरि त्यागिते। असें-
हि ह्मणशील बा! जरि तरी तुझी

# मावली, तुज त्यजुनि पाजितां कशि दुधाकडे धांवली ॥ ५२ ॥

तुला मी फार अवडतों असें तूं बोलण्यांत दाखवितोस, पण मजपेक्षां तुला विषय फार आवडतात असें तुह्मी ह्मणाल, तर हा दोष मजकडे लावूं नका, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. भवन्मतिस आवडे जरि धनादिकांलागि ते मदीय गुणकीर्त्तन श्रवण कां तरि त्यागिते. तुझ्या मतीला अतिशयें करून जर मी आवडतों तर ते ह्म० ती तुझी मति धनादि विषयांकरितां ह्म० धनादिकांकडे आसक्त होऊन माझ्या गुणांचे कीर्त्तन, व श्रवण यांचा त्याग कां करिते. असेंहि ह्मणशील बा जरि. बा देवा! असं जर तूं ह्मणशील, तरी—तर, मी तुला विचारतों एवढें सांग. तुझी मावली तुज त्यजुनि पाजितां कशि दुधाकडे धांवली. तुझी मावली ह्म० आई—कृष्णावतारीं जिला तूं आई ह्मणत होतास ती यशोदा, तुला पाजीत असतां तुझा त्याग करून दुधाकडे कशी धांवली? दूध उतूं जात होतें तें सांभाळण्याकरितां त्या दुधाच्या भांड्याकडे कां धांवली. साक्षात् भगवंताचा लाभ झाला असतां त्याचा त्याग करून दूध ह्मणजे काय तुच्छ पदार्थ, तसल्या तुच्छ विषयाकडे जशी ती लुब्ध झाली, तशीच माझी मति तुला सोडून विषयाकडे धांवते. धांवते खरी, पण याचा दोष केवळ आह्मांकडे लावूं नका. हा विषयवासनेचा खेळ आहे. तिजपुढें आमचा उपाय चालत नाहीं, असा भाव ॥ ५२ ॥

**अनावर पिशाचिका विषयवास-ना सत्य जी, असें करवि कृत्य जी भुलविते कधीं न त्यजी। ह्म-णोनि तुज जाणत्या विनवितों इला काढ गा! करीन मग तूंज री ह्मणसि आपणा गाढ गा॥५३॥**

ही विषयवासना जीवांस मोहपाशांत घालणारी फार दुष्ट आहे, अशी तिची निंदा करीत होत्साता कवि ह्मणतो. महाराज! अनावर पिशाचिका विषय-वासना सत्य. ही विषयवासना अनावर अशी पिशा-ची आहे, ह्म० सत्य ही जखीण आहे. ही भल्याभल्यां-ला आवरत नाहीं. जी असें करवि कृत्य. हीच पिशाचिका असें कृत्य करविते, ह्म० ईश्वराकडचें लक्ष काढून विषयांकडे लावते. आणि जी भुलविते कधीं न त्यजी. जी मोठमोठ्यांला भूल घालते. एकदा पिच्छास लागली ह्मणजे कधीं सोडीत नाहीं अशी ही महादुष्ट आहे. या विषयवासनापिशाचीचा पंचाक्षरी तूं आहेस. ह्मणोनि तुज जाणत्या विनवितों इला काढ गा. तूं जाणता आहेस–भूतें काढण्याची मंत्रविद्या तूं जाणतोस. याकरितां तुला वारंवार विनंती करतों कीं, अगा देवा! हिला काढ. ही पिशाची आह्मांस फार छळते, हिनं आह्मांला ग्रासिलें हिला काढून टाक, ह्मणजे आह्मी स्वस्थचित्त

होऊं. आणि, करीन मग तूं जरी ह्मणसि आपणा गाढ गा. मग जर तूं ह्मटलेंस कीं, मला गाढ गा ह्म० दृढपणानें–एकनिष्ठपणानें गा ह्म० मदीय गुणकीर्तनश्रवण कर, तर मी तसें करीन. परंतु ह्या विषयवासनारूप पिशाचीचा जों उपद्रव आहे तोंपर्यंत तसें होणें कठीण आहे, असा भाव ॥ ५३ ॥

---

**तुझ्या गुणकथा महासुरभि त्यां-**
**त ही रासभी, शिरे विषयवास-**
**ना जशि शुका अहीरास भी।**
**तशी न इतरास भी इस सदं-**
**डही हाकिती, तथापि बहु लाथ-**
**ळी मग अदंड मी हा किती ॥५४॥**

मागील श्लोकांत विषयवासना ही पिशाची आहे ह्मणून सांगितलें; आतां या श्लोकांत विषयवासना ही गाढवी आहे, असें वर्णीत होत्साता कवि ह्मणतो. तुझ्या गुणकथा महासुरभि त्यांत ही रासभी शिरे विषयवासना. हे भगवन्, तुझ्या ज्या गुणकथा त्याच महासुरभि–कामधेनु होत. त्यांमध्यें ही विषयवासना रासभी ह्म० गाढवी बळेंच शिरते. कोणाला भीत नाहीं. जशी शुका अहीरास भी तशी न इतरास भी. तिला हाकून लावण्याविषयीं पुष्कळ झटतात; परंतु मागें एकवेळ शुक हाच कोणी अहीर ह्म० गवळी त्याला जशी भ्याली होती तशी इतरास

ह्म० दुसऱ्या कोणास भीत नाहीं. कित्येक, इस सदंडही हाकिती. हातांत दंड घेऊन हिला हाकितात, तथापि, बहु लाथळी. तरी ती फार लाथा मारते, कोणाला मोजीत नाहीं. सदंडांची ही दशा! मग अदंड मी हा किती. ज्याच्या हातीं दंड नाहीं असा हा मी तिला हाकून लावण्यास समर्थ किती? मी समर्थ नाहींच. येथें कवीनें रूपक फार चमत्कारिक केलें आहे. भगवत्कथेला कामधेनूची उत्तम पदवी देऊन विषयवासनेला गाढवीची नीच पदवी दिली. ती शुकाला भ्याली ह्म० शुकानें मात्र विषयवासना जिंकिली होती. इतर विश्वामित्रादि मुनि विषयवासना जिंकावयास पाहतात, परंतु ती फिरून फिरून त्यांच्या गळीं पडते; हेंच लाथा मारणें होय. सदंड ह्म० संन्यासी, सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत वास करतात, तरी त्यांस विषयवासना सोडीत नाहीं. कवि ह्मणतो मी अदंड ह्म० गृहस्थाश्रमी आहे, तेव्हां माझ्यानें ती घालविली जाते कशी! सारांश ही विषयवासना परमेश्वराची उपासना करण्यास मोठी विघ्नकारिणी आहे. हिचा पराभव परमेश्वर करील तरच होईल, असा भाव ॥ ५४ ॥

---

**खरासुर जसा तशी विषयवासना हे खरी, हिचा वध करावया तुजचि शक्ति आहे खरी। बकी सुमति ताटका लघु न हे भली**

# लाजशी, उगाचि तशि एक ही व्रजवनांत लीला जशी ॥ ५५ ॥

मागील श्लोकांत विषयवासना ही सामान्य गाढवी आहे ह्मणून सांगितलें; आतां या श्लोकांत ही, दैत्यरूपी गाढवी आहे असें सांगतो. खरासुर जसा तशी विषयवासना हे खरी. पूर्वीं कृष्णावतारीं कंसाचा भृत्य एक खरनामा दैत्य होता, तोही गाढवाच्याच रूपाचा होता व तुमचा नाश करूं पाहात होता, तो तुह्मीं मारिला. त्या खरासुरासारखीच ही विषयवासना खरी ह्म० दैत्यरूपी गाढवी आहे. हिचा वध करावया तुजचि शक्ति आहे खरी. तुह्मीं त्या खरासुराचा वध केला यावरून या खरीचाही वध करण्याची शक्ति तुह्मांलाच खरी-सत्य आहे. तुह्मी ह्मणाल कीं, खरासुर पुरुष होता ह्मणून मीं त्याचा वध केला. ही खरी ह्म० स्त्री आहे हिचा वध कसा करावा? तर तुह्मी स्त्रीचा वध केला नाहीं काय? बकी-पूतना ही कोण होती? तशीच ताटका ही कोण होती, स्त्रीच होती ना? त्यांचा जसा वध केला तसा हिचा करा. मला वाटतें, त्या दोघी हिच्या इतक्या दुष्ट नव्हत्या. बकी सुमति. पूतना तर चांगल्या बुद्धीची होती; कांकीं, ती मातेच्या वेषानें तुह्मांकडे आली होती, आणि ताटका लघु. ताटका ही तर उगीच साधारण राक्षसी होती; पण, न हे भली. हे ह्म० ही खरी भली नव्हे बरं! फारच दुष्ट आहे. पहा, पूतनेनें कितीएकांचीं मुलें मारिलीं, आणि ताटिकेनें कितीएक ब्राह्मणांच्या यज्ञांचा

नाश केला, इतकाच काय तो त्यांचा उपद्रव, आणि या खरीचा तर जगत्त्रयाला नेहमीं उपद्रव आहे. तर भ-शांचा वध करावया, लाजशी उगीच. या खरीचा वध करावयास उगाच कां लाजतां–संकोच कां धरतां? व्रजवनांत ह्म० गोकुळांत जशा अनेक लीला केल्या तशी ही एक लीलाच होईल. त्या लीलेंत खर मारला, या लीलेंत खरी मारिली इतकेंच. हिचा वध केला ह्मणून तुह्मांला स्त्रीवधनिमित्त कोणी नांव ठेवणार नाहीं, उलटी शाबासकीच देतील ॥ ५५ ॥

---

**कसें तरि असो मग स्वपणरक्षणा-कारणें, अवश्यशरणागतव्यसन तों स्वयें वारणें। तुह्मां विहित मुख्य हें न पुसतां करा हो खरी, निजोक्ति खर काय तो अधिक संहरा हो खरी ॥ ५६ ॥**

आपल्या सेवकांचें संकट दूर करणें हें तुह्मांला अवश्य आहे, अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करतो. कसें तरि असो मग. आमच्या भिडेमुळें ह्मणा किंवा तुमच्या आवश्यकतेमुळें ह्मणा, कसेंही असो; परंतु स्वपणरक्षणाकारणें अवश्य शरणागतव्यसन तों स्वयें वारणें. आपण केलल्या प्रतिज्ञेचें रक्षण व्हावें इतक्याकरितां तरी शरणागताचें व्यसन–संकट तर स्वयें–जाती-

नें दूर करणें अवश्य आहेना? होय, आहे. तर मग, तुह्मां विहित मुख्य हें. भक्तांचें संकट मी दूर करीन अशी जी तुमची प्रतिज्ञा ती संभाळणें हेंच तुमचें मुख्य कर्तव्य कर्म आहे. याजकरितां, न पुसतां करा हो खरी निजोक्ति. करूं न करूं असा विचार न करितां निजोक्ति ह्म० आपली प्रतिज्ञा खरी करा ह्म० सत्य करा. ती या खरीचा वध केल्यावांचून कशी होईल? तिचा वध करावयास तुह्मीं मागें पुढें कां पाहतां? तो खर काय अधिक ह्म० तो काय अधिक दुष्ट होता, आणि ही खरी काय कमी दुष्ट आहे? ही त्यापेक्षां फारच दुष्ट आहे, ह्मणून ह्मणतों. संहरा हो खरी. अहो देवा! खरीचा संहार करा. ही नांवाची खरी, पण आहे खोटी; हिचा नाश अवश्य केला पाहिजे ॥ ५६ ॥

---

खरी करितसे कशी तव जनींहि
सत्ता पहा, इचा वध नानिंद्य बा!
प्रबळ मूर्त सत्ताप हा। कथा-
सुरभिचा सर स्वहित पुष्कळ
स्वादुही, ह्मणे त्यजुनि कां मला
निजधना परस्वा दुही ॥ ५७ ॥

खरीचा दुष्टस्वभाव दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. खरी करितसे कशी तव जनींहि सत्ता पहा. ही खरी इतर जनांवर सत्ता करिते याचें नवल नाहीं; पण तुम-

ऱ्या जनांवर ह्मणजे भगवद्भक्तांवरही कशी सत्ता करीत आहे पाहा; ह्मणून मी ह्मणतों, इचा वध न निंद्य बा. देवा! ह्या खरीचा वध निंद्य नाहीं; ह्म० स्तुत्यच आहे. ही खरी नव्हे तर, प्रबळ मूर्त संताप हा. साधुजनांला हा मूर्तिमंत तापच आहे. ही भगवज्जनांवर कोणत्या प्रकारची सत्ता करिते ह्मणाल तर, कथासुरभिचा रस स्वहित पुष्कळ स्वादुही. तुमच्या कथा ह्याच कामधेनु, त्यांचा रस ह्मणजे दुग्ध, स्वहित पुष्कळ स्वादुही, ह्म० हितकारक, विपुल आणि गोडही आहे, ह्मणून भगवज्जन त्यांचेंच दोहन करितात. पण ही द्वाड गाढवी, ह्मणे त्यजुनि कां मला निजधना परस्वा दुही. निजधना मला त्यजुनि, परस्वा कां दुही ह्मणे. मी तुमचें निजधन असतां परस्व ह्मणजे पराचें धन ज्या कथासुरभि त्यांचें दोहन कां करतां ह्म० कामधेनु त्या परपुरुषाच्या आहेत आणि मी गाढवी तुमची सत्तेची आहें. तर माझेंच दूध काढीत जा. कामधेनूंचें काढूं नका, असें दटावून सांगत्ये. येथेंही कवीनें रूपकच केलें आहे. हरिकथेपासून सुखाची इच्छा करूं नका. विषयांपासून सुखाची इच्छा करा अशी बुद्धि देत्ये हें तात्पर्य ॥ ५७ ॥

---

**कथा सुरभि या भल्या स्वजननींहुनी वाटती, शिशूंस जरठांसही निरखितां रसें दाटती। दुहोत भलते सदा तरि न लेश-**

## ही आटती, स्ववत्समल भक्षि-
## ती परि न सर्वथा बाटती ॥ ५ ॥

प्रसंगेंकरून भगवत्कथेला सुरभि असें जें कवीनें ह्मटलें तेंच दृढ करण्याकरितां प्राधान्येंकरून त्यांची स्तुति करितो. कथा सुरभि या भल्या स्वजननीहुनी बाटती. भगवत्कथारूप कामधेनु ह्या आमच्या मातांपेक्षां फार चांगल्या अशा वाटतात. कारण कीं, आमच्या आया लहान बालकांस पाहून मात्र पान्हवतात, आणि त्या तर, शिशूंस जरठांसही निरखितां रसें दाटती. त्या लहान अपत्यांला ह्म० अज्ञानांला आणि वृद्ध अपत्यांला ह्म० सज्ञानांला पाहतांच पान्ह्यानें दाटतात ह्म० उभयतांसही रसलाभ होतो. आणखी, दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती. कोणी परिचित किंवा अपरिचित असोत, भलते कोणी कां दोहन करीनात, त्यांस रस मिळतोच. तसेंच, सदा ह्म० निरंतर जरी दोहन करीत असलें तरी लेश मात्र आटत नाहींत ह्म० रस कमी होत नाहीं. त्याहून आणखी एक मोठा गुण त्यांच्या आंगीं आहे तो हा कीं, स्ववत्समल भक्षिती परि न सर्वथा बाटती. आपल्या वत्साचा मळ चाटून खातात, पण त्या योगानें त्या दोषयुक्त होत नाहींत. वांसराचें आंग चाटून निर्मळ करण्याचा गाईचा स्वभाव आहे तोच येथें कवीनें सुरभींकडे दाखविला आहे. येथें वत्स ह्म० भक्तजन, मल ह्म० पातक आणि रस ह्म० भक्तिरस असा अर्थ समजावा ॥ ५८ ॥

---

कथांसि उपमा दिली सुरभिंची दिसे नीट ती, परंतु बहु मंद मी ह्मणुनि सच्छ्रुती वीटती। कथा निरुपमा तयांप्रति पशूपमा शुद्ध तें, नव्हेचि, न विचारिलें बुधजनांसि म्यां उद्धतें॥ ५९॥

आपल्या बोलण्याला दोष देण्यानें कथांचा मोठेपणा वर्णीत होत्साता कवि ह्मणतो. कथांसि उपम दिली सुरभिंची दिसे नीट ती. तुमच्या कथांला म्यां सुरभींची उपमा दिली ती युक्तीनें मला नीट दिसते; परंतु बहु मंद मी ह्मणुनि सच्छ्रुती वीटती. परंतु मी केवळ मंद ह्म० बुद्धीचा जड आहे ह्मणून साधूंचे कान ही माझी उक्ति ऐकून वीटती ह्मणजे कंटाळतील. ही त्यांस चांगली वाटणार नाहीं असें मला दिसतें. कारण कीं, कथा निरुपमा. कथांस अगोदर उपमाच नाहीं. त्यांत उपमा देणें तर, तयांप्रति पशूपमा! सुरभि तरी पशूच होत, त्या पशूंची उपमा कथांस द्यावी? देऊं नये; असें असतां म्यां मंदानें दिली पण, शुद्ध तें नव्हेचि; ह्म० तें योग्य नव्हेच. ही मजकडून चूक झाली. सुरभींची उपमा कथांस द्यावी कीं न द्यावी हें, न विचारिलें बुधजनांसि म्यां उद्धतें. म्यां दांडग्यानें गर्विष्ठपणानें बुधजनांस ह्म० पंडित

जनांस विचारलें नाहीं. हा जो मजपासून प्रमाद घडला याची क्षमा करावी ॥ ५९ ॥

---

**असेंहि उपदेशिती गुरु हरीस वंदा रुचे, निजस्तव जसा तसा अगुण घे न वंदारुचे। ह्मणोनि निगमस्तुता! भलतसें तुला वानितों, परंतु ह्रदयीं महाजनभयास मी मानितों ॥ ६० ॥**

कथांला सुरभींची उपमा देऊं नये ती दिली ही चुकी तर म्यां पदरीं घेतलीच; परंतु याला एक कारण आहे. कोणतें ह्मणाल तर, असेंहि उपदेशिती गुरु हरीस वंदा. हरीला ह्म० परमेश्वराला कसें तरी वंदा ह्म० नमा किंवा वंदा. "वदिं अभिवानस्तुत्योः", (वंद धातूचे दोन्ही अर्थ आहेत) असाही उपदेश गुरु करतात. 'हरीस वंदा' या ठिकाणीं 'रहस्य मंदा' असाही पाठ कोणी लिहितात, त्याचा अर्थ गुरु असेंही रहस्य मंदा उपदेशिती ह्म० थोर पुरुष मूर्खाला अशीही गुप्त गोष्ट सांगतात. कां कीं, रुचे निजस्तव जसा तसा जसा वेडावांकडा स्तव करावा तसा हरीला आवडतो. अगुण घे न वंदारुचे. नमन करणाराचे किंवा स्तवन करणाराचे दोष हरि काढीत नाहीं, असा थोरांचा उपदेश म्यां ऐकिला. ह्मणोनि निगमस्तुता भलतसें तुला वानितों. हे निगमस्तुता ! निगम

ह्म० वेद त्यांनीं स्तुत स्तविलेला अशा देवा! ह्म० वेदांनीं तुह्मी स्तुति करावी अशी योग्यता आहे, तथापि मलतसें वेडेंवांकडें जसें येईल तशाप्रकारें तुझा स्तव करितों. करतों खरा, परंतु ह्रदयीं महाजनभयास मी मानितों. महाजन ह्म० साधुजन मला काय ह्मणतील हें भय मी मनांत बाळगतों. हें भय माझें जाईल तर बरें होईल ॥ ६ ॥

---

# ह्मणें स्वकृतिच्या उणें किमपि एकवर्णीं न हो, असें तुज कधीं बरें विगतशंक वर्णीन हो! असे-चि अशि आवडी करिशि कां न-अत्यादर, स्वभक्तसुरपादपाह-रि! नसेचि सत्यादर ॥ ६१ ॥

जेव्हां मी तुमचा स्तव करूं लागतों तेव्हां मुखावाटे अपशब्द निघतील काय असें भय माझ्या मनांत असतें, तें भय कृपा करून तुह्मी घालवा, अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करितो. ह्मणें स्वकृतिच्या उणें किमपि एकवर्णीं न हो. स्वकृतिच्या ह्म० माझ्या स्तुत्यात्मक कवितेच्या एकाही वर्णीं ह्म० एकाही अक्षरांत किमपि उणें न हो ह्म० कांहीं दोष न व्हावा. असें तुज कधीं बरें विगतशंक वर्णीन हो. हो ह्म० अहो देवा! अशा प्रकारें विगतशंक होत्साता ह्म० कोणाचें भय न बाळगतां

तुला कधीं वर्णीन ह्म० योग्य शब्दांनीं तुझा स्तव कधीं करीन बरें ? असें मी मनांत ह्मणतां आणि, असेचि अशि आवडी. मनापासून अशी आवड मला आहे खरीच; मग, करिशि कां न अत्यादर. माझ्या आवडी-चा तूं अति आदर कां करीत नाहींस ! ह्म० अंगीकार कां करीत नाहींस ? स्वभक्तसुरपादपा हरि. ह्म० हे भक्तां-च्या कल्पवृक्षा देवा ! भक्तांचे मनोरथ पूर्ण करणें क-ल्पतरूला कठीण नाहीं, तर हा माझा मनोरथ कां पूर्ण करीत नाहींस ? नसेचि सत्या दर. ह्म० खऱ्याला भय नाहीं. याचें तात्पर्य हेंच कीं, कवि ह्मणतो माझ्या आवडीचा तुह्मी आदर करीत नाहीं हें खरें आहे. मग खरें बो    र भय कशाचें ? ॥ ६१ ॥

---

**ध्रुव स्तवानिं आवडी धरि ह्मणो-नि अत्यादरें, तुह्मीं करुनि दावि-ली शिवुनि गळ सत्या दरें । तसें मज करा करांबुजधरा ! शिरीं मावरा, वराभयपरा ! पराक्रम-पटो ! मना आंवरा ॥ ६२ ॥**

तुझ्या आवडीचा अत्यादर मी कोणत्या प्रकारें करावा असें विचाराल तर सांगतों. ध्रुव स्तवानिं आवडी धरि ह्मणोनि. ध्रुवानें तुमच्या स्तवनाविषयीं आवड धरली याकारितां, अत्यादरें तुह्मीं करुनि दावि-

ली शिवुनि गह्ल सत्या दरें. ध्रुवाच्या गालाला दरें ह्म० शंखानें स्पर्श करून ह्म० या युक्तीनें त्यावर प्रसाद करून त्याची ती आवड मोठ्या आदरानें सत्या ह्म० खरी करून दाखविली, ह्म० त्या आवडीचें फळ तुह्मीं त्याला दिलें. तसें मज करा. ह्म० ध्रुवाच्या गालाला शंख लावला तसा माझ्या गालाला लावून मला कृतार्थ करा. हे मावरा ह्म० हे लक्ष्मीपते ! हे वराभयपरा ह्म० वर आणि अभय देण्याविषयीं समर्था देवा ! शंख राहूं द्या, शिरीं करांबुज धरा. तुह्मीं कमलाकार आपला हस्त माझ्या मस्तकावर ठेवा आणि, हे पराक्रमपटो मना आवरा. तुह्मी पराक्रम करण्याविषयीं कुशल ह्म० समर्थ आहां; तर माझें हें जें अनिवार मन त्याचें दमन करा. इतकें केलें ह्मणजे तुह्मी माझ्या आवडीचा अत्यादर केला असें होईल, असा भाव ॥ ६२ ॥

---

**करांबुज असो नसें उचित त्या-**
**स मी पामर, प्रणाम करिती प-**
**दाप्रतिहि सन्मुनी सामर। पदा-**
**ब्जरजही जगत्त्रयनमस्क्रिया-**
**भाजन। प्रसादचतुरा ! कसा तरि**
**करा बरा हा जन ॥ ६३ ॥**

ध्रुवासारखें मला करा असें प्रथम ह्मटलें, परंतु ध्रुवाची योग्यता मला नाहीं, असें सुचवीत होत्साता कवि

प्रार्थना करितो. करांबुज असो. मला कृतार्थ करण्याकरितां करांबुज शिरीं धरा असें मीं ह्मटलें खरें, परंतु करांबुज राहूंद्या. कां कीं, नसें उचित त्यास मी पामर. त्यास ह्म० करांबुजाला मी पामर ह्म० नीच उचित नाहीं. तर, पदांबुज ठेवा, अशा अभिप्रायानें त्याची स्तुति करितो. प्रणाम करिती पदाप्रतिहि सन्मुनी सामर. पदाची योग्यता लहान नाहीं. तुमच्या पदाप्रतिही सामर सन्मुनी ह्म० देव आणि मुनि प्रणाम करितात. तें पद माझ्या मस्तकीं ठेवा. पुन्हा ह्मणतो. त्या पदांबुजालाही मी योग्य नसेन तर त्या पदांबुजाचा एक रजःकण जरी माझ्या मस्तकीं ठेवला तरी मी कृतार्थ होईन, अशा अभिप्रायानें त्याची स्तुति करतो. पदाब्जरजही जगत्त्रयनमस्क्रियाभाजन. तुमच्या पदकमलाचें रज देखील जगत्त्रयाच्या नमस्काराला पात्र आहे. त्या रजाची योग्यता लहान नाहीं, तें रज जरी माझ्या मस्तकीं ठेविलें तरी मी कृतार्थ होईन. त्या पदाब्जरजालाही मी पात्र नसेन तर आणखी एखाद्या युक्तीनें मला कृतार्थ करा, अशा अभिप्रायानें पुन्हा ह्मणतो. प्रसादचतुरा कसा तरि करा बरा हा जन. हे प्रसादचतुरा ! ह्म० प्रसादकरण्याविषयीं तुह्मी चतुर आहां; तुह्मांला म्यां पामरानें सुचवावें असें नाहीं. कसा तरि ह्म० कोणत्या तरी प्रकारानें हा जन ह्म० हा जो मी तुमचा दास हा बरा करा. ह्म० कृतार्थ करा. माझ्या सर्व बाधा दूर करून मला बरा करा ॥ ६३ ॥

---

**तुह्मीं करुनि दाविला ध्रुव कृतार्थ जैसा दरें, तसेंच जरि योजिलें तुमचिया मनें सादरें। असो विहित तें करा परि बरोबरी त्यासवें, नसे उचित तो महाप्रबळ वंदिजे वासवें ॥ ६४ ॥**

मला कृतार्थ करण्याविषयीं देवाला म्यां चार पांच प्रकार सुचविले; परंतु देव समर्थ व उदार आहे, यामुळें पहिल्याच प्रकारानें तो मला कृतार्थ करणार नाहीं कशावरून ? कदाचित् करणार असेल, पण मला तितकी योग्यता नाहीं हें देवाला आणखी एक वेळ बजावून सांगावें अशा अभिप्रायानें कवि पुन्हा प्रार्थना करितो. तुह्मीं करुनि दाविला ध्रुव कृतार्थ जैसा दरें. हे प्रभो ! तुह्मीं शंखाच्या स्पर्शानें ध्रुव जसा लोकांत कृतार्थ करून दाखविला. तसेंचि जरि योजिलें तुमचिया मनें सादरें. तुमच्या सादर मनानें मजविषयीं जर तसेंच योजलें असेल तर असो; पण मी आपणाकडून तुह्मांस सांगतों. विहित तें करा. ह्म० योग्य असेल तें करा. परि बरोबरी त्यासवें नसे उचित. परंतु ध्रुवाशीं माझी बरोबरी करणें योग्य दिसत नाहीं. कां कीं, तो महाप्रबळ. त्याचें सामर्थ्य मोठें आहे, तसें सामर्थ्य मला कोठें आहे ? आणखी तसाच तो, वंदिजे वासवें. ह्म० देवांचा राजा जो इंद्र त्यालाही तो वंद्य असा

होता. मला तितकी योग्यता कोठें आहे, तर अशा समर्थ ध्रुवाशीं मज पामराला बरोबरी कशी शोभेल ? शोभणार नाहीं ॥ ६४ ॥

---

**किती वय कसें तप प्रखर काय विश्वास तो, ध्रुव ध्रुव खरा स्तवा उचित होय विश्वास तो। कशी तुळितसां तुम्ही प्रकट मेरुशीं मोहरी, प्रसाद करितां उणें अधिक नाठवा हो हरी!॥ ६५॥**

ध्रुवाशीं बरोबरी मला शोभणार नाहीं असें मागील श्लोकांत सांगितलें ह्मणून या श्लोकांत ध्रुवाची योग्यता वर्णून आपला कमीपणा दाखवीत होत्साता कवि प्रार्थना करितो. महाराज! ध्रुवाचें सामर्थ्य काय सांगावें ? किती वय. त्याचें वय पाहिलें तर पांचां वर्षांचें बाळ. पण, कसें तप प्रखर काय विश्वास! तो त्याची कडकडीत तपश्चर्या काय. आणि काय विश्वास, गुरु नारद याच्या वचनावर विश्वास तरी त्यानें किती दृढ ठेविला होता? यावरून, तो ध्रुव ध्रुव खरा. तो ध्रुव बाळ नांवाप्रमाणें ध्रुवच खरा ह्म० निश्चयाची केवळ मूर्तीच ह्मणूनच, स्तवा उचित होय विश्वास तो. विश्वाला तो स्तुत्य झाला. अशा ध्रुवाशीं जर माझी बरोबरी तुह्मी करणार तर मी तुह्मांला ह्मणतों, कशी तुळितसां तुह्मी प्रगट मेरुशीं मोहरी. अहो महाराज! तुह्मी मेरुपर्वताब-

रोबर धडधडीत मोहरीचा दाणा कसा तोलतां? कोठें मेरु आणि कोठें मोहरी, कांहीं तरी सादृश्य? कांहींच नाहीं. जेव्हां तुह्मी मेरूची आणि मोहरीची बरोबरी करावयास पाहतां तेव्हां असें वाटतें कीं, प्रसाद करितां उणें अधिक नाठवा हो हरी. देवा! तुह्मी दासांवर प्रसाद करूं लागलां ह्मणजे उणं अधिक मनांत आणीत नाहीं. ह्म० पात्रापात्र विचार करीत नाहीं. सर्वांवर सारखा प्रसाद करितां हेंच खरें ॥ ६५ ॥

---

**प्रभुत्व तरि हेंच कीं करुनि दे कृपा दान तें, स्वसाम्य यदुपाजनें मिरविजे स्वपादानतें। प्रसाद मग काय तो जरि निवारिना लाघवा, कसें दशमुखानुजा विसरलां अहो राघवा!॥६६॥**

प्रसाद करूं लागलां ह्मणजे अधिक उणं मनांत आणीत नाहीं असा जो मी तुमचा स्वभाव वर्णिला तो तुह्मांसारख्या उदार प्रभूला कीर्तिकरच आहे, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. प्रभुत्व तरि हेंच कीं करुनि दे कृपा दान तें. त्याचेंच नांव प्रभुत्व ह्म० प्रभुत्यालाच ह्मणावें; कीं जो कृपा करून दीनाला तें दान देतो. तें कोणतें तर, स्वसाम्य यदुराजनें मिरविजे स्वपादानतें. ज्या दानाच्या संपादनानें त्या शरणागत दीनानें

स्वसाम्य ह्म० प्रभूचें साम्य मिरविजे, ह्म० तो दीन दास प्रभूची योग्यता लोकांत मिरवितो, ह्म० लोक त्याला प्रभूप्रमाणें मानतात. असें जर होत नाहीं तर, प्रसाद मग काय तो. मग तो प्रभूचा प्रसाद कशाचा? जरि निवारिना लाघवा. ज्यावर प्रसाद झाला त्याचें लाघव ह्म० लघुत्व अर्थात् दीनपणा जर तो प्रसाद निवारीत नाहीं तर त्याला प्रसाद ह्मणूं नये. असा प्रसाद मीं कोणावर केला ह्मणाल तर, असें दशमुखानुजा विसरलां अहो राघवा. ज्या वेळेस तुह्मी राघव ह्म० दाशरथि राम झालां होतां त्या वेळेस तुह्मांला शरण आलेला जो दशमुखानुज ह्म० रावणाचा कनिष्ठ बंधु बिभीषण त्यावर प्रसाद करून त्याची योग्यता तुह्मी वाढविली नाहीं काय? तो शत्रूचा भाऊ असतां अनन्यभावानें तुह्मांस शरण आला, इतक्याच निमित्तानें तुह्मी त्याजवर इतके प्रसन्न झालां कीं, तूं माझा बंधु आहेस, असें देखील तुह्मीं त्याला ह्मटलें. त्या बिभीषणाला विसरलां काय? हें एक उदाहरण सांगितलें. तुमच्या औदार्याचें वर्णन कोणीं करावें! ॥ ६६ ॥

---

**असो वरि कसा तरी विमल भाव ज्याचा करा, तयावरि दया पचे वर असाचि द्या चाकरा। वृथाचि गमतें दिलें बहुहि जें न दासा जिरे, पुसोनि अधिकार द्या**

# सुकर ते सदा साजिरे ॥ ६७ ॥

ध्रुवाची आणि बिभीषणाची योग्यता जरी मला नाहीं, तरी मी दयेस पात्र आहें; अशा अभिप्रायानें कवि प्रार्थना करतो. असो वरि कसा तरी विमल भाव ज्याचा करा तयावरि दया. तुमचा दास वरवर दिसण्यांत कसा तरी असो, ह्म० कसाही कां असेना; पण ज्याचा भाव ह्म० अंतःकरण विमल—निर्मल आहे त्यावर दया करा. माझा भाव निर्मळ असला तर तुह्मी दया करालच असा भाव. पण इतकें मी सांगतों कीं, पचे वर असाचि द्या चाकरा. तुह्मी आपल्या दासाला जो वर द्याल तो त्याला पचेल असा द्या. ईश्वर प्रसन्न झाल्यावर त्यानें थोडें कां द्यावें, असें ह्मणाल तर, वृथाचि गमतें दिलें बहुहि जें न दासा जिरे. जें देणें दासाला जिरत नाहीं तें पुष्कळ जरी दिलें तरी तें व्यर्थसें वाटतें. ज्याला पावशेराची भूक त्याला जर शेरभर खाऊं घातलें तर तें त्याला कसें जिरेल? तें ओकावें लागेल. ह्मणून मी ह्मणतों, पुसोनि अधिकार द्या. ज्याला वर द्यावयाचे त्याचा अधिकार पुसून वर द्या, ह्म० पात्रतेचा विचार करून तदनुरूप वर द्या. विचार करून वर दिले असतां, सुकर ते सदा साजिरे. ते वर सुकर ह्म० देण्याघेण्याच्या सोईचे आणि सदा साजिरे ह्म० निरंतर अनुभवण्याच्या सोईचे असे असतात. ध्रुवासारखे व बिभीषणासारखे प्रसाद मला नकोत. माझ्या योग्यतेप्रमाणेंच मला प्रसाद द्या, असा भाव ॥ ६७ ॥

---

**प्रसन्न बहु होतसां परि कराल हो बावरें, शिवापरि वरासवें हृदय हें न हो बा! वरें। असा वृक कृतघ्न हें न कळलें कसें हो! हरा, भला! जगविला तुह्मीं भवमहाहिचा मोहरा ॥ ६८ ॥**

अधिकार पाहून वर द्यावे असें जें मी तुह्मांस ह्मटलें याचें कारण असें कीं, प्रसन्न बहु होतसां. तुह्मी एकाद्यावर प्रसन्न होऊं लागलां ह्मणजे फारच होतां. सुमार पाहात नाहीं. परि कराल हो बावरें शिवापरि वरासवें हृदय. परंतु वर देण्याबरोबर शिवाचें हृदय जसें बावरें झालें तसें तुह्मी आपलें हृदय वर देण्याबरोबर बावरें कराल हो! तसें करूं नका. हें न हो बा वरें. बा देवा! वरें ह्म० वरदानानें अशी गोष्ट होऊं नये. शिवापरि असें जें ह्मटलें त्याविषयींच प्रश्न करतां. असा वृक कृतघ्न हें न कळलें कसें हो हरा? अहो महाराज! वृकासुर असा कृतघ्न ह्म० वर देणाऱ्याचाच घात करण्यास प्रवर्तणारा आहे हें त्या हरा ह्म० महादेवास कसें कळलें नाहीं! आणि, ज्याच्या मस्तकावर तूं हात ठेविशील तो भस्म होईल, असा वर त्याला कसा दिला? तो वृकासुर महादेवालाच जाळून भस्म करणार होता; पण, भला जगविला तुह्मी भवमहाहिचा मोहरा. संसाररूप महासर्पाचा मोहरा ह्म० विष हर-

णारा मणिच असा जो महादेव तो तुह्मी त्या वेळे-स युक्तीनें भला जगविला. नाहीं तर तो मोहरा जगाला नाहींसा झाला असता. पण तुह्मी त्या कृत-घ्नाच्या कृतघ्नपणाचें फळ त्यासच देऊन शिवाला संक-टांतून काढलें; येणें करून जगावर तुमचा मोठाच उपकार झाला. असो, तुह्मी आणि महादेव एकच आहां ॥ ६८ ॥

---

**भजे सुदृढनिश्चयें द्विजकुमारक क्षीरधी, तया करिं तुह्मीच द्या मदनमारक! क्षीरधी। उदारपण तें बरें सुखवि जें सुपात्रा सदा, दिलें अमृत पन्नगा तशि खळीं कृपा त्रासदा ॥ ६९ ॥**

आतां विष्णु आणि शिव एकरूपच अशी भावना करून शिवाचें औदार्य तेंच विष्णूचें, अशा अभिप्राया-नें कवि ह्मणतो. भजे सुदृढ निश्चयें द्विजकुमारक क्षीरधी. द्विजकुमारक ह्म० व्याघ्रपाद मुनीचा पुत्र जो उपमन्यु तो क्षीरधी ह्म० दूध मिळविण्याची बुद्धि धारण करून अत्यंत दृढ निश्चयानें तुह्मांला भजला; तेव्हां, तया करिं तुह्मीच द्या मदनमारक क्षीरधी. अहो मदन-मारक ह्म० अहो मदनांतका, महादेवा! तुह्मीच तया ह्म० द्विजकुमारकाला, करीं ह्म० हातीं अर्थात् त्याच्या स्वा-

धीन क्षीरधी ह्म० दुग्धसमुद्र द्या ह्म० देते झालां. या तुमच्या औदार्यानें त्या मुलाला किती आनंद झाला असेल बरें! यासाठीं मी ह्मणतों, उदारपण तें बरें सुखवि जें सुपात्रा सदा. जें उदारपण सतत सुपात्राला सुखवितें तें उदारपण बरें ह्म० चांगलें. नाहीं तर, दिलें अमृत पन्न-गा. सर्पाला पुष्कळ दूध पाजलें, पण काय उपयोग? तशि खळा कृपा त्रासदा. त्याप्रमाणें खळावर ह्म० दुष्टाव-र केलेली जी कृपा ती त्रासदेणारी होते. ह्मणून मीं पूर्वींच ह्मटलें कीं, ज्याचें अंतःकरण निर्मल आहे त्यावर कृपा करावी ॥ ६९ ॥

**अतिप्रिय सुखप्रद प्रथम तूं मु-दंभोद! या, मयूरत्वदया तुझी क्षण विटो न शंभो! दया। उ-दारपण वानिलें अजि गुरूप-हासा बळें कसें करिल लेकरूं निपट हें पहा साबळें ॥ ७० ॥**

आपल्या भाषणाचा शिवास कोप आला असेल असें मानून कवि शिवाचें क्षमापन करितो. अतिप्रिय सुखप्रद प्रथम तूं मुदंभोद या मयूरत्वदया. हे मुदंभोद शंभो! ह्म० आनंदरूप जल देणारा घन जो तूं तो या मयूरत्वदयाला प्रथम ह्म० अगोदरच अतिप्रिय आणि सुखप्रद आहेस. मयूराला मेघाइतका प्रियकर

पदार्थ दुसरा कोणताच नाहीं ह्मणून, तुझी क्षण विटो न शंभो दया. हे शंभो ! तुझी दया क्षणमात्रही या मयूराला विटूं नये ह्म० कंटाळूं नये. ज्या मोराला मेघापासून सुख मिळतें तो मोर मेघाची कधीं तरी निंदा करील काय? मी मयूर आहें आणि तूं आनंदघन आहेस ह्म० तूंच मला अतिप्रिय आणि सुखप्रद आहेस, मी तुझी निंदा करणार नाहीं. तुह्मी ह्मणाल कीं, त्वां महादेवाचीं वर्मैंकर्में बाहेर काढिलीं हें कसें? तर म्यां वर्में काढिलीं असें समजूं नका. उदारपण वानिलें, ह्म० महादेवाचें औदार्य वर्णिलें. अजि गुरूपहासा बळें कसें करिल लेकरूं निपट हें पहा सावळें. आणि महाराज! हें केवळ सावळें ह्म० भोळें अज्ञान लेकरूं गुरूपहासा ह्म० थोराच्या उपहासातें ह्म० निंदेतें बळें कसें करील? करणार नाहीं. अज्ञान लेंकरूं बुद्धिपूर्वक वडिलांची निंदा कधीं करणार नाहीं, आणि कदाचित् साहजिक बोलण्यांत तसा भास झाला तरी त्याची क्षमा वडिलांनींच केली पाहिजे, असा भाव ॥ ७० ॥

---

**तुह्मां हरिहरांत ज्या दिसतसे दिसो वास्तव, प्रबुद्ध ह्मणती नसे तिळहि भेद मी यास्तव । ह्मणें मनिं यथार्थ जें स्वमत वर्णिती शैव तें, न वैष्णव दुराग्रही परम मुख्य हीं दैवतें ॥ ७१ ॥**

तुमचा प्रसाद जोडण्याकरितां मी तुमची प्रार्थना करीत असतां तुमच्या समक्ष शिवाची निंदा मी कशी करीन? तुह्मी आणि शिव एकच आहां, तेंव्हां शिवाची निंदा ती तुमची होणार नाहीं काय? अशा अभिप्रायानें शिव विष्णु यांचा अभेद कवि वर्णितो. तुह्मां हरिहरांत ज्या दिसतसे दिसो. हरि ह्म० विष्णु आणि हर ह्म० शिव या तुह्मां दोघांत भेदभाव कोणा मंदमतीला दिसत असेल तर दिसो; परंतु, वास्तव प्रबुद्ध ह्मणती नसे तिळहि भेद. तत्त्वज्ञ ह्मणतात कीं, तिळमात्रही भेद नाहीं. मी वास्तव ह्मणं मनिं. त्यांच्या ह्मणण्यावरून मीही आपल्या मनांत हरिहरांत भेद नाहीं असें ह्मणतों. यावरून, यथार्थ जें स्वमत वर्णिती शैव तें; ह्म० जे केवळ शैव आहेत ते जें स्वमत वर्णितात तें यथार्थ नाहीं; आणि, न वैष्णव दुराग्रही. दुराग्रही वैष्णव जें स्वमत वर्णिती तेंही यथार्थ नाहीं. ते एक मुख्य आणि एक गौण करून भेदकल्पना करतात, ह्मणून दोघांचींही मतें खरीं नाहींत. तर, परम मुख्य हीं दैवतें. हीं दोन्ही दैवतें मुख्यच आहेत. यांत गौणता कोणाकडेही नाहीं. एकरूप असतां कारणपरत्वें दोन रूपें धरिलीं इतकेंच. जरी दोन रूपें धरिलीं तरी त्यांची एकात्मता अशी आहे कीं, एकाला कांटा बोंचला तर दुसऱ्याला रक्त येतें. सारांश असा तुह्मां उभयतांचा अभेद असतां मी शिवाची निंदा कशी करीन? करणार नाहीं ॥ ७१ ॥

---

**ह्मणें क्षण पुरांतक क्षण मुरांतक ब्राह्मणा, मला जरि ह्मणाल बा! तरि विशंक लुब्रा ह्मणा । तुह्मां शिव शिवा तुह्मी भजतसां शुक व्यास हा, सदर्थ वदले पुरातन कथा न नव्या सहा ॥ ७२ ॥**

हरिहरांच्या अभेदाविषयीं सप्रमाण युक्ति कथित होत्साता कवि ह्मणतो. ह्मणें क्षण पुरांतक क्षण मुरांतक. महाराज ! मी तुह्मांला क्षणभर पुरांतक ह्म० महादेव ह्मणतों, आणि क्षणभर मुरांतक ह्म० विष्णु असें ह्मणतों. यामुळें, ब्राह्मणा मला जरि ह्मणाल बा! तरि विशंक लुब्रा ह्मणा. तुह्मीं मला ब्राह्मणाला, लुब्रा ह्म० चोंबडा किंवा तोंडपुजा ह्मणाल तर बा देवा! विशंक ह्मणा ह्म० खुशाल ह्मणा. मला तर तुह्मीं दोघे एकरूपच वाटतां. याला आणखी प्रमाण, तुह्मां शिव शिवा तुह्मीं भजतसां. ह्म० तुह्मीं दोघे एकमेकांस फार भजतां ह्म० शिव ह्मणतो मी विष्णुभक्त आहे, आणि विष्णु ह्मणतो मी शिवभक्त आहें. शुक व्यास हा सदर्थ वदले पुरातन कथा न नव्या सहा. हा खरा अर्थ शुक आणि व्यास बोलले. त्याच ह्या पुरातन कथा ह्मणजे पुराणें. न नव्या ह्म० नवीन नाहींत. ह्मणून, सहा ह्म० सहन करा. शिवाला विष्णु आणि विष्णूला शिव ह्मटल्याचा राग मानूं नका. किंवा सहा हें

कथांचें विशेषण करावें. सद्दा कथा ह्म० याविषयीं सद्दा शास्त्रें पुरातन आहेत ॥ ७२ ॥

---

**तुझाचि अवतार तो सुत परा-
शराचा वळे, तदुक्तिस जन प्र-
भो! जरि निजेमधें चावळे। त-
री त्रिभुवनेश्वरा ! तव विशुद्ध
नामावली, मुखीं प्रगट होय जी
करि सुखी जना मावली ॥७३॥**

हरिहरांत भेद नाहीं असें व्यास बोलला ह्मणून म्यां सांगितलें. तो व्यास दुसरा कोणी होता कीं काय ? तुझाचि अवतार तो सुत पराशराचा. पराशर ऋषीचा सुत जो व्यास तो तुझाच अवतार; त्यानें सांगितलें तें त्वांच सांगितलें असें समजलें पाहिजे. कां कीं, वळे तदुक्तिस जन प्रभो ! हे प्रभो, तदुक्तिस ह्म० त्या व्यासाच्या वचनास सर्व जन वळतो ह्म० त्याच्या वचनास अनुकूळ राहून मानितो. त्या व्यासाची योग्यता काय सांगावी ! जरि निजेमध्यें चावळे तरि त्रिभुवनेश्वरा. हे त्रिभुवनेश्वरा देवा ! तो जरि निजेमध्यें चावळे ह्म० झोपेंत बोलला तरी, तव विशुद्ध नामावली मुखीं प्रकट होय. तुझी शुद्ध नामावली मुखापासून निघत असावी. जी करि सुखी जना मावली. जी मावली ह्म० आईसारखी नामावली जनाला सुखी

करितें ह्म० अखंड सुख देते. तात्पर्य तुमच्या नामाचा महिमाच तसा विलक्षण आहे ॥ ७३ ॥

---

**तुझें कुशळ नाम बा! हळुहळू मना आकळी, दुरत्यय असा महाखळहि त्यास भी हा कळी। हरी व्यसन पाप हें बहु कशास कायाधवा, परी त्वरित भेटवी तुजहि योगमायाधवा ॥७४॥**

व्यासाच्या मुखांतून सर्वदा तुझीं नामें निघतात ह्मणून मागील श्लोकांत सांगितलें, त्या प्रसंगानें भगवन्नामाचा महिमा कवि वर्णितो. तुझें कुशळ नाम बा हळुहळू मना आकळी. बा देवा ! तुझें नाम मोठें कुशल आहे ह्म० चतुर आहे. तें मनाला हळुहळू आकळितें. इतकें जरी मन अनिवार आहे तरी त्याचें तें युक्तीनें आकलन करितें ह्म० त्यास स्थिर करितें, किंवा स्ववश करितें. तसेंच, दुरत्यय असा महाखळही त्यास भी हा कळी. दुरत्यय ह्म० दुर्जेय आणि महाखळ ह्म० दुष्ट असाही जो कळी ह्म० कळिकाळ त्या नामाला भितो. तुझ्या नामाच्या शक्तीपुढें कळीचें कांहीं चालत नाहीं. आणखी, हरी व्यसन पाप हें. हें नाम पाप आणि व्यसन यांतें हरी ह्म० हरितें. बहु कशास? फार काय सांगावें. कायाधवा परी त्वरित भेटवी तुजहि

योगमायाधवा. योगमायेचा पति जो तूं त्या तुला हें त्वरित भेटवितें. कसें तर, कायाधवापरी. कयाधूचा पुत्र तो कायाधव ह्म० प्रल्हाद त्यासारखें ह्म० प्रल्हादाची आणि देवाची गांठ नामानें जशी घातली तशी नामधारकाची आणि तुझी गांठ नामच घालून देतें ॥ ७४ ॥

---

**तुझ्यासमचि हें गुणें अणु उणें नसे नाम हा, दिसे अधिकही तसा गुण तुला असेना महा। सदैव भलत्यासही सुलभ आणखी गायका, छळी न न अधोगति क्षणहि दे जगन्नायका! ॥ ७५ ॥**

नामाची आणि ईश्वराची बरोबरी सांगून नामांत कांहीं गुण अधिक आहेत असें दर्शवीत होत्साता कवि ह्मणतो. तुझ्या समचि हें गुणें अणु उणें नसे नाम. हें तुझें नाम गुणानें तुझ्या सारखेंच आहे; अणु ह्म० लेशमात्रही उणें नाहीं. किंबहुना, हा दिसे अधिकही तसा गुण तुला असेना महा. हा गुण नामाच्या आंगीं अधिकही दिसतो; तो गुण तुला नाहीं, नामामध्यें अधिक गुण तो कोणता आहे ह्मणाल तर सांगतों. सदैव भलत्यासही सुलभ. सर्वदा सुलभ आणि भलत्यास ह्म० अनधिकारी नसला तरी त्यालाही सुलभ ह्म० सुखानें प्राप्त होतें. तशी तुमची प्राप्ति होत

नाहीं. आणखी गायका छळी न. ह्म० कीर्तन करणाराला छळीत नाहीं. तसेंच, न अधोगति क्षण हि दे जगन्नायका. हे जगन्नायका, हे जगदीश्वरा देवा! तें नाम क्षणभरही कोणाला अधोगति देत नाहीं. तुह्मी गायकाला छळतां आणि बहु काळ अधोगति देतां. छळ व अधोगति हे शब्द कवीनें येथें द्व्यर्थ घातले आहेत. नामपक्षी छळ ह्म० दुःख आणि अधोगति ह्म० दुर्गति असा अर्थ. ईश्वरपक्षीं छळ ह्म० कपट आणि अधोगति ह्म० पातालगति असा अर्थ. देवानें वामनावतार घेऊन बळीला कपटानें वश केलें आणि बहुतकाळपर्यंत त्याला पाताळीं घातलें अशी कथा प्रसिद्ध आहे, ती लक्षून कवीनें नामाचें आधिक्य वर्णिलें आहे ॥ ७५ ॥

---

**छळीं नृप बळी बळी तरिच तो नसे आटला, गमे बहु भला मला न सकळांसही वाटला। परीक्षक करी तसें जडहि सोशितें हे मही, न केवळ विरोचनात्मज तरे पदें हे मही ॥ ७६ ॥**

तुमचें नाम भक्तांला छळीत नाहीं, तुह्मीं भक्तांला छळितां, या व्यंग्योक्तीनें तुह्मीं बळीचा छळ केला असें दर्शविलें, तोच पक्ष घेऊन कवि बळीची प्रशंसा करितो. छळीं नृप बळी बळी तरिच तो नसे आटला.

बळिराजा तो खराच बळी होता ह्म० बळकट होता, ह्मणून तो तुमच्या छळांत आटला नाहीं ह्म० हरला नाहीं; अर्थात् टिकला. अतएव, गमे बहु भला. तो फार भलासा वाटतो. मला न सकळांसही वाटला. मलाच भला वाटला असें नाहीं; तर तो सर्वांसही भला वाटला. ज्यांनीं ज्यांनीं त्याची गोष्ट ऐकिली त्यांनीं त्यांनीं त्याला शाबासकी दिली. कीं, धन्य बिचारा बळिराजा ! त्यानें देवाचा छळ सोशिला नाहीं; तर मला वाटतें त्याला तो सोसणें भाग पडलें. कारण आपला उत्तम गुण प्रगट करावा असें ज्याच्या मनांत असतें त्याला दुसऱ्याचा छळ सोसावा लागतो. परीक्षक करी तसें जड-हि सोशितें हेमही. जड ह्म० अचेतन असेंही हेम ह्म० सुवर्ण तेंही, परीक्षक जसें जसें करितो ह्म० तावतो, घांसतो, तोडतो इत्यादि जें जें करितो तें तें सोसून घेतें, ह्मणून त्याचा उत्तम गुण प्रकट होतो. तसा बळीनें छळ सोसला ह्मणून त्याचा उत्तम गुण प्रकट झाला, आणि तो परीक्षेस उतरला ह्मणूनच तुमच्या पायानें तरला. न केवळ विरोचनात्मज तरे परंं हे मही. तुमच्या पायानें केवळ विरोचनात्मज ह्म० बळि तरला इतकेंच नाहीं. तर, त्या पायानें ही मही ह्म० पृथ्वीही तरली. पायापासून निघालेल्या गंगेनें पृथ्वीवरील लोक तरले असें तात्पर्य ॥ ७६ ॥

---

**असा न करितां जरी छळ तरी प्रभो! तो भली, सुकीर्ति कशि पा-**

वता कविसभा जिणें शोभली । पदीं उपजती नदी कशि कशी त्रि-लोकीसती, अशा अतुल मौक्तिकावलिविणें बरी दीसती ॥ ७७ ॥

तुह्मीं बळीचा छळ केला हेंही एका पक्षीं चांगलें झालें, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. असा न करितां जरी छळ तरी प्रभो. हे प्रभो ! तुह्मीं जरी बळीचा असा छळ केला नसता तरी, तो भली सुकीर्ति कशि पावता. तर मग त्या बळीला उत्तम कीर्ति कशी मिळती? कविसभा जिणें शोभली. कीं ज्या कीर्तीनें कविलोकांची सभा शोभली ह्म० ती कीर्ति कविलोकांला गावयास उपयोगी पडली. तसेंच, पदीं उपजती नदी कशि. बळीपासून त्रिपाद भूमि घेण्यासाठीं जेंव्हां तुह्मीं पाय वर उचलला तेंव्हां गंगा उत्पन्न झाली. असें न करतां तर पायाचे ठायीं नदी ह्म० गंगा कशी उत्पन्न होती; आणि ती गंगा जर उत्पन्न झाली नसती तर, कशी त्रिलोकीसती अशा अतुल मौक्तिकावलिविणें बरी दीसती. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ यांचा समुदाय हीच कोणी सती ह्म० साध्वी स्त्री आणि गंगा ही मोत्यांच्या माळेप्रमाणें त्रिलोकीला भूषणरूप झाली, ह्मणून ती बरी दिसूं लागली. सारांश, तुह्मी बळीचा छळ केला हा जगत्त्रयावर मोठा उपकारच झाला ॥ ७७ ॥

---

कानें छळ अधीर मी तशि न की-
र्ति हो चामरें, नृपासि उचितें वृ
था मिरविलीं जरी पामरें। अकी-
र्तिच असो रुचे तुज कशी व्रजीं
कांबळी, असें न समजां कसें व-
रिल हारिला कां बळी ॥ ७८ ॥

बळीसारखा छळ करून मग कृपा करावी असें जर तुमच्या मनांत येत असेल तर; हे देवा ! नको छळ अधीर मी तसा छळ मजला नको; कारण बळीसारखें धैर्य मला नाहीं. छळ सोसल्यावांचून कीर्ति कशी मिळेल असें ह्मणाल तर, तशि न कीर्ति हो. बळीसारखी माझी कीर्ति न झाली तर न होवो; तशा कीर्तीस मी योग्य नाहीं. यास दृष्टांत,—चामरें नृपासि उचितें. चवऱ्या हीं राजचिन्हें राजासच योग्य. वृथा मिरविलीं जरी पामरें. नीच पुरुषानें जरी आपल्या मस्तकावर मिरविलीं तरी तीं व्यर्थ होत; त्याला शोभा देत नाहींत. याजकरितां, अकी-र्तिच असो. मला अपकीर्तिच आवडली. यास दृष्टांत—रुचे तुज कशी व्रजीं कांबळी. कृष्णावतारीं जेव्हां तुह्मी गोकुळांत होतां तेव्हां तेथें तुह्मांला कांबळी ह्म० घोंगडी कशी आवडली ? पीतांबर घेण्याची तुम-ची योग्यता असतां तुह्मी जशी घोंगडी पतकरिली तशीच मी अकीर्ति पतकरली. अकीर्ति काळी, ह्मणून तिला

कवीनें काळ्या घोंगडीचा दृष्टांत दिला तो बरोबर दिला सुकीर्ति टाकून अपकीर्तीची इच्छा कां करतोस असें ह्मणाल तर, असें न समजा कसें वरिल हारिला कां बळी. जो बळी ह्म० बलाढ्य आहे तो हारिला ह्म० पराजयाला कां पतकरील ? मी बळी नव्हे, मग बळीची योग्यता मला कशी येईल ? हें तुह्मीं कसें समजत नाहीं ॥७८॥

---

**छळाल कृपणासि कां अजि दया-निधे! कापिती, भटासि भट सं-गरीं परि न कातरा दापिती। कराल तितुकी कृपा बहु अहो शरण्या! तमीं, बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी ॥ ७९ ॥**

छळ सोसण्याविषयीं मी दुर्बळ आहें; त्यापक्षीं तुह्मी तसें करणार नाहीं, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. छळाल कृपणासि कां अजि दयानिधे. अहो दयासागरा देवा ! कृपणाला ह्म० गरीबाला तुह्मी तरी कां छळाल ? छळणार नाहीं. हेंच दृष्टांतानें दृढ करितो. कापिती भटासि भट संगरीं. जे भट ह्म० योद्धे आहेत ते युद्धामध्यें आपल्या बरोबरीचा योद्धा पाहून त्यावर शस्त्र टाकतात. परि न कातरा दापिती. भिऱ्याला दटावीतही नाहींत; मग शस्त्र टाकणें कोठून ? छळावांचून पूर्ण कृपा कशी होईल असें ह्मणाल तर, कराल तितुकी कृपा बहु. छळ

केल्यावांचून आपण जितकी कृपा कराल तितकीच मला पुष्कळ होईल. अहो शरण्या ह्म० अहो शरणागत-वत्सला देवा! तमीं बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी. हा तुमचा शरणागत मी अरण्य ह्म० निर्जन वन त्यामध्यें तमीं ह्म० गाढ अंधकारांत पडून श्रम पावतों. मार्ग कोठें दिसत नाहीं. यामुळें काय करावें हें समजत नाहीं; ह्मणून तुह्मी येऊन मला सुमार्गास लावा. इतकी कृपा करा ह्मणजे पुरे, असा भाव ॥ ७९ ॥

---

**मुखासि जंव पातलीं श्रम अरण्य ऐशीं पदें, निजस्मृतिस जाहलीं विषय तीं तंव श्रीपदें। गुरूक्तिस करावया सफल जानकीजीवना! धरासुरतपःफळें त्वरित धांवलीं जीं वना ॥ ८० ॥**

मागील श्लोकाच्या शेवटीं श्रमतसें अरण्यांत मीं असें कवीनें ह्मटलें, तितक्यावरून रामावतारींची गोष्ट आठवून कवि वर्णितो. मुखासि जंव पातलीं श्रम अरण्य ऐशीं पदें. महाराज! माझ्या मुखास श्रम आणि अरण्य अशीं दोन पदें ह्म० शब्द जंव पातलीं ह्म० मुखावाटे जों बाहेर निघालीं. निजस्मृतिस जाहलीं विषय तीं तंव श्रीपदें. तंव ह्म० तों तीं श्रीपदें निजस्मृतीस विषय झालीं ह्म० तीं पावलें मला आठवलीं. तीं पावलें कोणतीं

स्र, गुरूक्तिस करावया सफल जानकीजीवना धरा-
सुरतपःफळें त्वरित धांवलीं जीं वना. हे जानकीजीव-
ना ह्म० हे सीतापते रामचंद्रा! जीं पावलें गुरूक्तिस सफल
करावयां त्वरित वना धांवलीं. ह्म० गुरु जो पिता दशरथ
त्यांची उक्ति ह्म० रामास वनास पाठवितों अशी कैकेयीला
दिलेली भांक, ती खरी करण्याकरितां त्वरित ह्म० वि-
चार न करितां एकाएकीं दंडकारण्याकडे धांवलीं.
मला वाटतें तीं पदें नाहीं धावलीं; तर धरासुर-
तपःफळेंच धांवलीं. धरासुर ह्म० ब्राह्मण जे दंड-
कारण्यांत तपश्चर्या करीत बसले होते त्यांच्या तपाचीं
मूर्तिमंत फळेंच काय त्यांकडे धांवत गेलीं. सारांश
आतां मी जसा अरण्यांत श्रम पावत आहें तशीं तीं
तुमचीं पावलें अरण्यांत श्रम पावत होतीं ॥ ८० ॥

---

तथीं प्रभुवरा! तसे सदय कां अ-
से आज हो, विचारुनि पहा बरें
निजमनीं महाराज! हो। वनोवनीं
फिरां पिशापरि ह्मणां अहोरात्र
हा! नसे कुशल भाषणीं परि
असे कृपापात्र हा ॥ ८१ ॥

सीतेला शोधण्याविषयीं तुह्मीं आपल्या पावलांस
श्रम दिले. यावरून सीतेविषयीं तुह्मांला दया आली
आणि मजविषयीं कां येत नाहीं, असा अभिप्राय मनांत

ठेवून कवि मोघमपणानें प्रार्थना करतो. तर्यी प्रभुवरा तसे सदय कां असे आज हो. अहो प्रभुवरा! तर्यी ह्म० रामावतारीं अरण्यात होतां त्या समर्यी तुह्मीं तसे सदय होतां आणि आज असे ह्म० निष्ठुर कां झालां ? विचारुनि पहा बरें निजमनीं महाराज हो. अहो महाराज! या गोष्टीचा तुम्हीच आपल्या मनांत विचार करून पाहा बरं. त्या वेळची आमची सदयता कोणती, असें ह्मणाल तर सांगतों. वनोवनिं फिरां पिशापरि ह्मणां अहोरात्र हा. दयेच्या योगानें वेड्यासारखे रानोरान फिरत असां आणि अहोरात्र हा! ह्म० हाय हा..!! असेंच ह्मणत असां. तर हे सदयतेवांचून केलेंत काय ? हें माझें मर्मोक्तीचें भाषण तुह्मास वाईट वाटेल, पण काय करूं ? नसे कुशल भाषणीं. मला चांगलें बोलतांच येत नाही. हा तुमचा दास भाषणाविषयी कुशल ह्म० चतुर नाहीं; परि असे कृपापात्र हा. परंतु तुमच्या कृपेला हा पात्र आहे. रागें न भरतां तशी दया मजविषयीं येऊं द्या, असा भाव ॥ ८१ ॥

---

**समागम तुझा घडो ह्मणुनि जा-**
**हले लांकडें, तपोऽनळिं तसे मुनि**
**त्यजुनि जोडिलीं माकडें ॥ अधिक**
**बहु ज्या जनास्तव घडे पडे खां-**
**कडें, तदुक्तिहुनि आमुचें बहुत**
**बोलणें वांकडें ! ॥ ८२ ॥**

सीतेवर रामाची दया फार ह्मणून सीतेकरितां रामानें अनुचित गोष्टी केल्या असें मनांत आणून कवि पुन्हा ह्मणतो. समागम तुझा घडो ह्मणुनि जाहले लांकडें तपोऽनळिं. तुझा ह्मणजे रामाचा समागम ह्म० सहवास घडावा ह्मणून जे मुनि तपोऽनळिं ह्म० तपोरूप अग्नीमध्यें लांकडें झाले; ह्मणजे तपश्चर्या करून करून आपला देह ज्यांनीं शुष्क काष्ठवत् करून घेतला; परंतु तुह्मीं, तसे मुनि त्यजुनि जोडिलीं माकडें. तशा मुनींचा त्याग करून ह्म० त्यांचा समागम सोडून तुह्मीं माकडें जोडिलीं. ह्म० माकडें व वानरें यांचा समागम केला. ठीकच, अयुक्त वहु ज्या जनास्तव घडे पडे सांकडें. ज्या प्रियजनाकरितां अशा प्रकारच्या पुष्कळ अयोग्य गोष्टी घडल्या आणि संकटही पुष्कळ पडलें. मग, तदुक्तिहुनि आमुचें बहुत बोलणें वांकडें. त्या जनाच्या बोलण्यापेक्षांही आमचें बोलणें फार वांकडें वाटावयाचेंच पण वांकडें नाहीं, याचा विचार तुह्मींच करा ॥ ८२ ॥

---

जगत्त्रयमनोहरा बलगुणैकरत्नाकरा! ह्मणे कनकरंकु द्या मज महाप्रयत्ना करा। प्रियाहि अशि जाहली तुज कुकार्य आज्ञापिती, सुधा त्यजुनि कामुक प्रकट अंगनाज्ञा पिती ॥ ८३ ॥

मागील श्लोकांत ज्या जनाला उद्देशून मोघमपणें बोलला तो जन आणि त्याची उक्ति येथें स्पष्ट करून दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. हे जगत्त्रयमनोहरा ह्म० हे त्रैलोक्यसुंदरा! हे बलगुणैकरत्नाकरा ह्म० हे बलगुणसमुद्रा रामा! अशीं तुह्मांला संबोधनें देऊन ह्म० अशा योग्यतेचे तुह्मी आहां असें बोलून दाखवूनही, ह्मणे कनककुरंकु द्या मज महाप्रयत्ना करा. मोठा प्रयत्न करा, पण मला कनकहरिण आणून द्या. प्रियाहि अशि जाहली तुज कुकार्य आज्ञापिती. ती जानकी तुमची प्रिया असतांही अशी कुकार्यं ह्म० वाईट काम आज्ञापिती झाली ह्म० धन्यानें सेवकास आज्ञा करावी तशी तुह्मांला आज्ञा करिती झाली. तेव्हां तुह्मांलाही तिचें प्रिय करण्याकरितां तशा कुकार्याचा स्वीकार करावा लागला. यावरून स्पष्ट आहे कीं, सुधा त्यजुनि कामुक प्रकट अंगनाज्ञा पिती. जे कामुक ह्म० स्त्रीलंपट पुरुष आहेत ते सुधा ह्म० अमृत टाकून अंगनेची ह्म० स्त्रीची आज्ञा पिती ह्म० अगोदर स्वीकारतात. ती आज्ञा अयुक्त असली तरी सुधेपेक्षां त्यांस अधिक आवडते ॥ ८२ ॥

---

# स्वदास समयीं जपे तरि न दे वरा चाकरी, चुके न परि सार्थक श्रम न देवराचा करी। वदेहि भलतेंचि तें तिसचि कोप टा-

# का पुसा, असें मृदु ह्मणोनि बा! मज न धोपटा कापुसा ॥ ८४ ॥

जानकीनें तुह्मांस कुकार्य करावयास सांगितलें इतकेंच नाहीं; तरती लक्ष्मणाशींही चांगली वागली नाहीं. पाहा, स्वदास समयीं जपे तरि न दे वरा. दासासारखा वागणारा अतएव स्वदास जो लक्ष्मण तो समयीं जपे ह्म० ज्या समयीं जें काम करावयाचें तें जपून करीत असे, तरी त्याला वर न दे. ह्म० तिनें तोंडानें बरें देखील ह्मटलें नाहीं. आणखी, चाकरी चुके न परि सार्थक श्रम न देवराचा करी. तो चाकरी करावयास चुकत नव्हता तरी त्या देवराचा ह्म० दीर जो लक्ष्मण त्याचा श्रम सार्थक केला नाहीं, ह्म० त्या श्रमाचें फळ तिनें त्याला दिलें नाहीं तें नाहींच; परंतु उलटें, वदेहि भलतेंचि तें तिसचि कोप टाका पुसा. त्याला बोलूं नये तें बोलली. ती काय बोलली तें माझ्यानें सांगवत नाहीं. मनांतील कोप टाका आणि तें तिलाच पुसा ह्म० तें तिलाच विचारा; मजवर रागावूं नका. असें मृदु ह्मणोनि बा! मज न धोपटा कापुसा. बा देवा! मी गरीब आहें ह्मणून मऊ कापूस समजून मला धोपटूं नका. जानकीच्या रक्षणार्थ लक्ष्मणास ठेवून जेव्हां रामचंद्र कनकमृगामागें गेले तेव्हां 'लक्ष्मणा धांव' असा त्या राक्षसानें मोठा शब्द केला. तो ऐकून सीता लक्ष्मणास ह्मणाली –'लक्ष्मणा! जा जा लवकर; रामचंद्राचा घात दिसतो.' तरी लक्ष्मण जाईना, तेव्हां पुनः सीता बोलली–'लक्ष्मणा! तूं जात नाहींस त्यापक्षीं तूं माझा अभिलाष करावयास पाहतोस काय? जा

दुष्टा येथून!' हें सीतेचें भाषण कवीला स्पष्ट बोलवेना ह्मणून इतकें बोलला; आणि रावणानें सीता नेल्यावर रामाला संकट पडलें ह्मणून 'सांकडें पडे' जें ह्मटलें तें हेंच ॥ ८४ ॥

---

**न जें प्रिय सदोष तें प्रिय स-**
**दोषही चांगलें, स्वतोक पितरां**
**रुचे जरिहि कर्दमीं रंगलें। तु-**
**लाचि धरि पोटिशीं कशि तदा**
**यशोदा बरें! जरी मळविशी र-**
**जोमलिनकाय तूं अंबरें ॥ ८५ ॥**

मागील चार श्लोकांचा तात्पर्यार्थ कथित होत्साता कवि ह्मणतो. न जें प्रिय सदोष तें. जें वस्तु प्रिय नाहीं ह्म० मनास आवडत नाहीं तें सदोष ह्म० त्याला कांहीं तरी दोष लावावयाचा; आणि, प्रिय सदोषही चांगलें. जें वस्तु प्रिय ह्म० आवडतें तें सदोष जरी असलें तरी चांगलें वाटतें, ही जनाची रीतिच आहे. याला दृष्टांत—स्वतोक पितरां रुचे जरिहि कर्दमीं रांगलें. चिखलांत रांगून चिखलानें जरी भरलेलें असलें तरी आईबापांला तें आपलें तोक ह्म० मूल फार आवडतें. याचें उदाहरण कवि देवाविषयींच दाखवितो.—तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ? कृष्णावतारीं जेव्हां तुह्मी रांगत होतां तेव्हां तुमची आई यशोदा तुह्मांला मोठ्या आवडीनें कशी पोटाशीं धरीत होती बरें ? जरी मळविशी रजो-

मलिनकाय तूं अंबरें. रजोमलिनकाय इ० सर्वांगीं चिखलानें भरलेले असे तुम्हीं त्या यशोदेचीं उत्तम वस्त्रें जरी मळवीत होतां तरी ती तुम्हांला पोटाशींच धरी, असा अर्थ ॥ ८५ ॥

---

**तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट ते, सुखप्रद गुणस्तवापरिस जाहले वाटते । क्षमा न करि एकदा तरिहि फार खोडी करां, न देचि भय ताडनोद्यमसमेत सोडी करां ॥ ८६ ॥**

तुम्ही रांगते होतां तेव्हां मात्र यशोदेची प्रीति तुम्हांवर होती असें नाहीं; तर मोठे चालते बोलते झालां तरी देखील तुम्हांवर तिची प्रीति फार होती, अशा अभिप्रायानें कवि म्हणतो. तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट ते सुखप्रद गुणस्तवापरिस जाहले वाटते. गोकुळांतील गोपिका तुमचे अनेक प्रकारचे बोभाट म्ह० गाऱ्हाणीं यशोदेस सांगत असत; परंतु ते बोभाट तिला तुमच्या गुणांच्या स्तवापेक्षांही सुखप्रद वाटत. असें कशामुळें ? तर तुम्हांवर तिची प्रिति फार म्हणून. आणखी, क्षमा न करि एकदा तरिहि फार खोडी करां. जरी फार खोडी करां म्ह० करीत असां, तरीहि ती क्षमाच करी; परंतु एकदा क्षमा न करी म्ह० एकवेळ मात्र

तिनें क्षमा केली नाहीं. जेव्हां तुह्मीं दुधाचा डेरा फो-डिला तेव्हां मात्र ती तुह्मांला मारावयास उठली. पण जेव्हां तुह्मीं आपलं तोंड रडवं केलें तेव्हां, न दोषि भय. तुह्मांला भय तर नाहींच दाखविलें. पण, ताडनोद्यमसमेत सोडी करां. तुह्मांला ताडन करण्याचा जो उद्यम ह्म० उपक्रम मनांत आणला होता त्यासुद्धां धर-लेले तुमचे हात सोडिती झाली. सारांश तुह्मांविषयीं जी तिच्या मनांत दया होती तिचा भंग कधीं झाला नाहीं ॥ ८६ ॥

---

**जरी ह्मणसि बांधिलें तरि न क-ष्टवीलें करा, विचार जसि कष्ट-वां तसि न कष्टवी लेंकरा। यथे-ष्ट पुरतें जरी प्रथम दाम कां सां-धिती, न ती प्रबळ गोपिका तुज तुझी दया बांधिती ॥ ८७ ॥**

यशोदेनें मला मारिलें नाहीं, पण उखळाशीं बांधून टाकलं होतें ना! असें तुह्मी ह्मणाल तर ऐका. जरी ह्मणसि बांधिलें तरि न कष्टवीलें. यशोदेनं मला उख-ळाशीं बांधिलें असें जरी तुह्मी ह्मणतां तरी बांधलं खरें; पण तुह्मांला तिनें कष्टविलं नाहीं. कशावरून तर, करा विचार. तुह्मीच आपल्या मनांत विचार करून पाहा कीं, जसि कष्टवां तसि न कष्टवी लेंकरा. तुह्मी जसे तिला कष्ट दिले

तसे तिनें आपल्या लेंकराला ह्म० तुह्मांला कष्ट दिले नाहींत. म्यां कोणते तिला कष्ट दिले ह्मणाल तर, तुह्मांला बांधते वेळेस दावीं जोडतां जोडतां तिला तुह्मीं थकविलें. तिनें इतकीं दावीं कशाकरतां जोडलीं ह्मणाल तर, यथेष्ट पुरतें जरी प्रथम दाम कां सांधिती. पहिलें दावें जर तुह्मांला बांधावयास बेतानें पुरलें असतें तर ती दुसरीं असंख्य दावीं कशाला सांधिती ह्म० कशाला जोडिती? हे खेळ तुमचे नव्हत काय ? तुह्मी ह्मणाल कीं, शेवटीं तिनें मला बांधलें तर खरें ! तर ती काय बांधूं शकणार ? न ती प्रबळ गोपिका. ती गोपिका ह्म० बिचारी यशोदा तुह्मांला बांधावयास समर्थ नव्हे. तर, तुज तुझी दया बांधिती. तुमची दयाच तुह्मांला बांधणारी आहे. पहिल्यानें तुह्मीं तिला कष्ट दिले, मग तुमच्या पोटांत तिजविषयीं दया उत्पन्न होऊन तुह्मींच आपणास बांधून घेतलें ॥ ८७ ॥

---

तुह्मींहि बळि बांधिला ह्मणुनि
आमुची माय जी, मनांत सहजा
दया निपट टाकिली काय जी ।
सकोप दिसती गुरु क्षणभरीच
जें तापलें, जल ज्वलनसंगमें त्य-
जि न शैत्य तें आपलें ॥ ८८ ॥

यशोदेनें कृष्णास बांधिलें तरी तिनें मनांतील दया टाकिली नव्हती, याविषयीं देवाचेंच उदाहरण दाखवीत होत्साता कवि दृष्टांत देऊन सांगतो. तुम्हींहि बळि बांधिला. अहो महाराज! तुम्हींही एकदां बळीला बांधिलें होतें. ह्मणुनि आमुची माय जी मनांत सहजा दया निपट टाकिली काय जी. आह्मां भक्तांची माय ह्म० आई अशी जी सहजा दया ह्म० तुमची स्वाभाविकी दया ती तुह्मी मनांतील अगदीं टाकिली होती काय? टाकिली नाहीं. तर, सकोप दिसती गुरु क्षणभरीच. गुरु ह्म० श्रेष्ठ किंवा वडील किंवा उपदेष्टे कारणपरत्वें क्षणभर मात्र सकोप ह्म० रागावल्यासारखे दिसतात; पण त्यांचा तो कोप उत्तरक्षणीं नाहींसा होतो; याला दृष्टांत.—जें तापलें जल ज्वलनसंगमें त्यजि न शैत्य तें आपलें. अग्नीच्या संयोगानें जें जल तापलें तें आपलें स्वाभाविक शैत्य टाकीत नाहीं. अग्निसंयोग गेला ह्मणजे तें पहिल्याप्रमाणेंच थंड होतें. तसें तुह्मीं जरी कोणाला बांधिलें किंवा मारिलें तरी तुमच्या मनांतील दया उणी होत नाहीं ॥ ८८ ॥

---

**प्रसिद्ध तुमचे महा सदय पाय जीवांकडे, चुकी ह्मणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे। न निष्ठुर पिता ह्मणे मनिं न हो प्रजा**

# टोणपी, अपथ्यरुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ॥८९॥

देवाचा सदयपणा कधीं भग्न व्हावयाचा नाहीं, असें स्थापित होत्साता कवि ह्मणतो. प्रसिद्ध तुमचे महा सदय पाय. महाराज ! तुमचे पाय महासदय ह्म० पराकाष्ठेचे कृपाळु आहेत, हें प्रसिद्धच आहे. असे जे स्वभावसिद्ध दयाळु पाय ते, जीवांकडे चुकी ह्मणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे. जीवांकडून चुकी झाली ह्मणून जीवांचें कल्याण करण्याविषयीं क्षणभर तरी वांकडे होतील काय, ह्म० निष्ठुर होतील काय ! नाहीं होणार. यास दृष्टांत.—न निष्ठुर पिता. जरी लेंकराकडून चुकी झाली तरी पिता लेंकराच्या हिता-विषयीं कधीं निष्ठुर व्हावयाचा नाहीं. तर, ह्मणे मानें न हो प्रजा टोणपी. तो इतकेंच मनांत ह्मणतो कीं, आपली प्रजा ह्म० संतति टोणपी ह्म० मूर्ख न व्हावी. इतक्याकरतां तो मुलांस रागें भरतो, व शिक्षा करतो; ह्मणून तो निर्दय झाला कीं काय ! त्यास निर्दय ह्मणतां येत नाहीं. आतां पिता सदयपणानें मुलांचें हित करीत असतां मुलें बापाचें न ऐकतां स्वच्छंदानें कां वागतात असें कोणी ह्मणेल तर, अपथ्य रुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी. ज्याला अपथ्य पदार्थ खाण्याची आवड असा कोणता रोगी कडू ओखदें पिणार आहे ? नाहीं. तो अपथ्यच खाणार. तसें ज्याला स्वच्छंद वर्तन आवडतें तो गुरूचा उपदेश ऐकत नाहीं ॥ ८९ ॥

**असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले, न निष्ठुरपणें कृपा करुनि ते भवीं तारिले। जगज्जनक तूं मुलें सकळ जीव यां भातुकें, दटावुनिहि देशि बा! अमृत नेदिजे घातुकें ॥ ९० ॥**

देवाच्या दयालुत्वाचें आणखी उदाहरण दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले. वेळोवेळीं युद्धामध्यें आपल्या हातानें असंख्य खळ ह्म० दैत्य, दानव, राक्षस इत्यादि दुष्ट तुह्मीं मारिले ह्म० त्यांस दंड केला. परंतु, न निष्ठुरपणें. त्यांस प्राणांतही दंड केला; पण निर्दयपणानें केला नाहीं. तर, कृपा करुनि ते भवीं तारिले. तुह्मी त्यांजवर अशी कृपा केली कीं, त्यांस या संसारापासून मुक्त केलें. ह्मणून, जगज्जनक तूं. या जगाचा खरा बाप तूंच आहेस. आणि, मुलें सकळ जीव. सर्व जीव ह्म० प्राणी हीं तुह्मीं मुलें होत. यास्तव, यां भातुकें दटावुनिहि देशि बा. देवा! या मुलांना जरी दटावतोस ह्मणजे दंड करतोस तरी भातुकें ह्म० खाऊ अर्थात् सद्गति देतोस. तस्मात् हें कृत्य सदयतेवांचून कसें घडेल? कां कीं, अमृत नेदिजे घातुकें. घातुकाच्या हातून अमृत दिलें जात नाहीं. दुसऱ्याचा नाश करावयास जो इच्छितो तो त्याला अमृत कसें देईल? देणार नाहीं ॥ ९० ॥

**वरि प्रकट शांतिला धरि परंतु मीना बकी, गिळी तशि तुला टपे सुकृतबुद्धिहीना बकी । जिणें गरळ पाजिलें अमृत पाजिलें तीस तां, खळासि न दिसो भले-पण खरे भल्या दीसतां ॥ ९१ ॥**

अमृत नेदिजे घातुकें असें मागल्या श्लोकांत सांगि-तलें, त्याचें उदाहरण देत होत्साता कवि ह्मणतो. वरि प्रकट शांतिला धरि परंतु मीना बकी गिळी. बकी ह्म० बगळी नदीतीरीं उभी राहून वरी ह्म० बाह्या-त्कारीं मात्र शांतीला धरिते; पण मीना गिळी ह्म० मासा जवळ आला कीं, पटकन त्याला गिळिते. तशि तुला टपे सुकृतबुद्धिहीना बकी. तशि ह्म० त्या बगळी-सारखी वर वर शांति दाखवून जिला पुण्य आणि सद्बुद्धि हीं दोन्ही नाहींत अशी बकी ह्म० पूतना तुला मारावयास टपत होती; पण चमत्कार असा झाला कीं, जिणें गरळ पाजिलं अमृत पाजिलें तीस तां. ज्या पूतनेनें तुह्मांला विष पाजिलें तिला तां ह्म० तुवां अमृत पाजिलें ह्म० उत्तम गति दिली. प्राणांत दंड करूनही तुह्मी तिला सद्गति दिली, यांचेंच नांव "दटावूनि घातुकें देसी." तर हा तुमचा केवढा उपकार? आतां, खळासि न दिसो भलेपण खरे भल्या दीसतां. हें तुमचें भलेपण खळास ह्म० कंसादि दुष्टांस न दिसलें

तर न दिसो, परंतु भल्यांला ह्म० साधुपुरुषांना तुह्मी खरे ह्म० भले दयाळु असे दिसतां ॥ ९१ ॥

---

**सदाहि हित नायकों बहु अपाय केले करूं, तरी सकृप बाप तूं ह्मणसि नायके लेंकरूं । कधीं न करिसि प्रभो! भजकबाळकोपेक्षण, न तूजवारि ज्यापरी पशुपपाळ कोपे क्षण ॥ ९२ ॥**

प्रासंगिक उदाहरणें मध्यें सांगून मागील श्लोक ८९ यांत जी ईश्वराची सदयता वर्णिली तीच दृढ करीत होत्साता कवि ह्मणतो. सदाहि हित नायकों. आह्मां जीवांचा स्वभाव तर असा आहे कीं, कधींही हिताची गोष्ट ऐकूंच नये. तुझा उपदेश न ऐकतां, बहु अपाय केले करूं. आपल्या नाशाचीं कृत्यें आजवर बहुत केलीं, व अशींच पुढें आणखीही करणार, असा आमचा हट्टी स्वभाव आहे. तरी सकृप बाप तूं ह्मणसि नायके लेंकरूं. तरी तूं कृपाळु बाप असें ह्मणतोस कीं, काय हो हट्टी लेंकरूं सांगितलेलें ऐकत नाहीं; इतकेंच ह्मणून राहतोस. कधीं न करिसि प्रभो भजकबाळकोपेक्षण. हे प्रभो! तूं भजक ह्मणजे भक्तजन हींच बाळकें ह्म० मुलें यांचें उपेक्षण ह्म० उपेक्षा कधीं करीत नाहींस. मुलें आपलें ऐकत नाहींत ह्मणून त्यांजवर कधीं कोप क-

रीत नाहींस, याचें उदाहरण आपणच आहां. न तू-जवरि ज्यापरी पशुपपाळ कोपे क्षण. तुह्मीं कृष्णावतारीं लहानपणांत पुष्कळ खोड्या करीत असां, सांगितलेलें ऐकत नसां, तरी तुह्मांवर पशुपपाळ ह्म० नंदगोप, ज्याला तुह्मी पिता ह्मणत होतां तो, क्षणभरही कोपत नसे. तसे तुह्मी स्वजनांवर कोप करीत नाहीं. दयाच करतां ॥ ९२ ॥

---

## खरा जनक तूं जनां इतर कोण हो! देव वी, समीहित फळें जगा तव पदाब्ज दे देववी । अशीच करुणा असो हरि! कधीं न भंगो पिता, अशा मज असाधुला इ-तर कोण संगोपिता ॥ ९३ ॥

ईश्वराचे ठायीं सदयता पूर्ण आहे असें दर्शवीत होत्साता कवि ह्मणतो. खरा जनक तूं. या जगाचा खरा जनक ह्म० बाप किंवा उत्पादक तूंच आहेस. जना इतर कोण हो देव वी. अहो ! इतर ह्म० दुसरा कोणता देव जनांला वी ह्म० उत्पन्न करणारा आहे ! कोणी नाहीं. समीहित फळें जगा तव पदाब्ज दे देववी. या जगाला इच्छित फळें तुझें पादकमळ स्वतां देतें आणि दुसऱ्याकडून देववितें, ह्म० कोणत्याही प्रकारें मनोरथ पूर्ण करितें. अशीच करुणा असो हरि. हे

हरि ह्म० हे देवा! तूं जगाचा बाप तेव्हां माझाही बापच आहेस. ह्मणून मजविषयीं तुला अशीच करुणा असो. मी मनांत ह्मणतों, देवा! कधीं न भंगो पिता. ह्म० देवाचें आणि माझें जें पितापुत्राचें नातें आहे तें कधीं न भंगो. ह्म० त्याचा कधीं भंग होऊं नये. कां कीं, अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता. असा जो मी असाधु ह्म० हट्टी दुर्वृत्त पोर त्या माझें संरक्षण करणारा तुजवांचून दुसरा कोण आहे? चांगल्या मुलाचें रक्षण कोण्ही करील, पण द्वाड मुलाचें रक्षण कोण्ही करणार नाहीं ॥ ९३ ॥

---

**सुविद्य धन मेळवी वचन आयके आंवरी, प्रपंच भर घे शिरीं करि कृपा पिता त्यावरी। असा जरि नसे रुचे तरि न तो अभद्रक्षण, तसा तुजचि आवडे करिसि तूंचि तद्रक्षण ॥ ९४ ॥**

जनांतील पित्याची गोष्ट निराळी आहे आणि ईश्वराची गोष्ट निराळी आहे, असें वर्णीत होत्साता कवि ह्मणतो. सुविद्य धन मेळवी वचन आयके आंवरी प्रपंच भर घे शिरीं करि कृपा पिता त्यावरी. पित्याला पुत्र कोणता आवडतो कीं, अगोदर सुविद्य, ह्म० ज्यानें विद्या चांगली संपादिली, मग धन मिळवं ला-

गला, वचन आयके ह्म० बापाच्या आज्ञेंत वागतो, बापाच्या हाताखालीं राहून प्रपंच आंवरतो, व पुढें आपल्या मस्तकावर प्रपंचाचा सर्व भार घेतो, अशा गुणांचा जो पुत्र असेल त्यावर पिता कृपा करतो. परंतु असा जरि नसे. असा ह्म० वर सांगितलेल्या गुणांचा जर नसला, रुचे तरि न तो अभद्र क्षण. तर तो अभद्र ह्म० करंटा द्वाड ह्मणून बापाला क्षणभरही रुचत नाहीं ह्म० आवडत नाहीं; मग कृपा कसची ! पण हे प्रभो ! तसा तुजचि आवडे करिसि तूंचि तद्रक्षण. तसा ह्म० निर्गुण पुत्र तुलाच आवडतो आणि त्याचें संरक्षण तूंच करतोस. त्याच योग्यतेचा मी आहें. माझें संरक्षण देवा तुह्मांवांचून कोण करील ? कोणी करणार नाहीं. ज्यानें प्रपंचाचा त्याग केला तो देवाला आवडतो हें बोलण्याचें तात्पर्य ॥ ९४ ॥

---

**पिता जरि विटे विटो न जननी कुपुत्रीं विटे, दयामृतरसार्द्रधी न कुलकज्जलें त्या किटे । प्रसादपट झांकिती परि परा गुरूचे थिटे, ह्मणूनि ह्मणती भले न ऋण जन्मदेचें फिटे ॥ ९५ ॥**

कुपुत्र पित्याला आवडत नाहीं, पण मातेला आवडतो, अशी लोकरीति दाखवून ईश्वराची कृपा हीच

माता असें पुढें सांगण्याच्या अभिप्रायानें कवि ह्मणतो. पितां जरि विटे विटो. पुत्र जर तसा गुणवान् नाहीं तर पिता विटतो. हा पुत्र कुलकज्जल आहे ह्मणून त्याचा कंटाळा करितो. अशा प्रकारें जरी पिता विटला तरी विटो. परंतु, न जननी कुपुत्रीं विटे. जननी ह्म० माता ही कुपुत्राविषयीं विटत नाहीं. कां कीं, दयामृतरसार्द्रधी न कुलकज्जलें त्या किटे. दयारूप अमृतरसानें तिची बुद्धि ओली असते ह्मणून ती माता त्या कुलकज्जल पुत्राच्या योगानें किटत नाहीं ह्म० मळत नाहीं. तिला तो वाईट वाटत नाहीं. ह्मणून ती आई त्या मुलावर दया करीतच असते. सारांश आईसारखें झांकण मुलाला कोणतेंच नाहीं. प्रसादपट झांकिती, परि परा गुरूचे थिटे. परा गुरूचे प्रसादपट झांकिती परंतु ते थिटे, परा गुरूचे ह्म० पित्याचे किंवा ज्ञानोपदेशकाचे प्रसादरूप पट ह्म० वस्त्रें मुलाला किंवा शिष्याला झांकतात खरे, तरी ते थिटे ह्म० अपुरते असतात. सर्वांग झांकीत नाहींत. आईचे प्रसादपट मुलाला अघळपघळ असतात. त्याला कोणीकडूनही उघडें पडूं देत नाहींत. ह्मणून ह्मणती भले न ऋण जन्मदेचें फिटे. याजकरितां भले ह्म० थोर थोर ह्मणतात कीं, जन्मदेचें ह्म० आईचें ऋण फिटत नाहीं. पितृऋणापासून मनुष्य मुक्त होतो, पण मातृऋणापासून होत नाहीं. इतके उपकार मुलावर आईचे असतात ॥ ९५ ॥

---

**विटेल जननीहि कीं शत रची निमित्तें विधी, मळे कलियुगीं श्रुती जशि खळीं तिची तेंवि धी। कदाचित विटेल बा! तव दया न दीनावरी, जशी जगदघक्षयीं कर भवन्नदी नावरी ॥ ९६ ॥**

जननी कुपुत्राला विटत नाहीं असें मागील श्लोकांत सांगितलें, परंतु त्यालाही बाधक दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. विटेल जननीहि. कदाचित् जननीही कुपुत्राला विटेल. कारण कीं, शत रची निमित्तें विधी. विधि ह्म० दैव शतावधि निमित्तें रचितें. तें कोणत्या तरी निमित्तानें तिच्या मनांत वीट आणील. मळे कलियुगीं श्रुती जशि. श्रुति ह्म० वेदत्रयी मळावयाची नाहीं तरी जशी कलियुगाचेठायीं कदाचित् मळते. खळीं तिची तेंवि धी. तेंवि ह्म० तशी तिची ह्म० मातेची धी ह्म० बुद्धि खळीं ह्म० त्या कुपुत्राविषयीं मळते. पण, कदाचित् विटेल बा तव दया न दीनावरी. तुमची दया ह्म० कृपा दीनावर कधींही विटावयाची नाहीं. कारण कीं, तिजपुढें विधीचें कांहीं चालावयाचें नाहीं. दीनावर प्रसाद करण्याविषयीं ती आपला हात आटोपीत नाहीं. कशी? जशी जगदघक्षयीं कर भवन्नदी नावरी. भवन्नदी ह्म० तुमची नदी अर्थात् गंगा जशी जगाच्या पापाच्या क्षयाविषयीं आपला हात

आंवरीत नाहीं. सारांश जननीपेक्षां तुमची कृपा अधिक आहे ॥ १६ ॥

---

**कृपाचि जननी तुझी सकल जीव दायाद या, तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया। असें उमजतां भले न गुरुभाव तो टाकिती, मता तुजहि गोपिका मग जनांस तोटा किती ॥ १७ ॥**

मातेपेक्षां तुमची कृपा अधिक आहे अशा अभिप्रायानें कवि वर्णितो. कृपाचि जननी तुझी. हे प्रभो! तुझी कृपा हीच सर्व जगाची मुख्य जननी ह्म० माता होय. आणि, सकल जीव दायाद. हे सर्व जीव ह्म० मनुष्यादि प्राणी तिचे दायाद ह्म० मुलें होत. या तिणेंचि उपदेशिल्या करिती सर्व दाया दया. ह्मणून, या ह्म० ह्या प्रसिद्ध ज्या आमच्या आया त्या दाया ह्म० उपमाता होत. मुलें सांभाळावयास जी बाई ठेवितात तिला दाई ह्मणतात. तशा ह्या आमच्या आया, त्या कृपाजननीच्या दाया आहेत. ह्या सर्व दाया तिणेंचि ह्म० कृपाजननीनेंच उपदेशिल्या ह्म० आज्ञापिल्या होत्सात्या आह्मांवर दया करतात. असें समजतां भले न गुरुभाव तो टाकिती. असें ह्म० कृपाजननीनें आमच्या संरक्षणार्थ ह्या ठेवल्या आहेत असें समजलें ह्मणून, भले ह्म०

जाणते कृतज्ञ प्राणी गुरुभाव टाकीत नाहींत, ह्म० दाया आमच्या आया नव्हत असें मानीत नाहींत; त्यांचेठायीं मातृभाव ठेवितात. यास उदाहरण—मता तुजहि गोपिका. गोपिका ह्म० यशोदा ती तुझी उपमाता असतां ती आईप्रमाणें तुला मानवली. उपमातेला माता ह्मटल्यानें तुझा कांहीं तोटा झाला नाहीं. मग, जनांस तोटा किती. जनानें उपमातेला माता ह्मटलें ह्मणून त्याचा तोटा तो काय होणार आहे ? कांहींच होणार नाहीं ॥ ९७ ॥

**भरोनि कुचकुंभ जी विषरसें मुखीं दे बकी, प्रभो! तिसहि ठेविशी जसि महासुखीं देवकी। न होति जननी कशा पशुपदार गाई लया, न पावति तत्सुखें कृति न कोण गाईल या ॥ ९८ ॥**

यशोदा तुला दूध पाजीत होती, व तुझें लालन पालन करीत होती, तिला माता ह्मटलें यांत नवल नाहीं; पण आईच्या वेषानें तुझा घात करावयास आली जी पूतना तिलाही त्वां मातेची पदवी दिली हें आश्चर्य. अशा अभिप्रायानें कवि वर्णितो. भरोनि कुचकुंभ जी विषरसें मुखीं दे बकी. जी बकी ह्म० पूतना विषरसानें आपले कुचकुंभ भरून ते कुंभाकार कुच ह्म० स्तन तुझ्या

मुखीं देती झाली. इतक्याच कारणानें, प्रभो ! तिसहि ठेविशी जशि महासुखीं देवकी. हे प्रभो ! देवकी ह्म० तुझी साक्षात् जननी जशी महासुखीं ह्म० परलोकींच्या अखंड सुखांत ठेविली तशी ती पूतनाही त्वां महासुखीं ठेविली. विषानें भरलेले स्तन मुखीं घेतल्यानें पूतना जेव्हां तुझी जननी झाली तेव्हां मग न होति जननी कशा पशुपदार गाई. गोकुळांतील गोपांच्या बायका आणि त्यांच्या गाई ह्या तुझ्या जननी ह्म० आया कशा न होतील ? अर्थात् होतीलच होतील. कां कीं, जेव्हां ब्रह्मदेवानें गोपांचीं मुलें आणि गाईंचीं वासरें चोरून नेलीं तेव्हां एक वर्षभरपर्यंत मुलें आणि वासरें तुझींच झालां आणि त्यांच्या त्यांच्या आयांचें स्तनपान केलें. अतएव, लया न पावति तत्सुखें. त्यांचीं सुखें ० पशुपदार-गोपाल आणि गाई यांचीं सुखें लयास ह्म० नाशास पावणार नाहींत. अर्थात् तेही अखंड सुखांत राहतील. मग, कवि न कोण गाईल या. या तुमच्या कवि ह्म० दयाळूपणाचीं आणि कृतज्ञपणाचीं कृत्यें कोण कवि गाणार नाहीं ? सर्व गातील ॥ ९८ ॥

**अशी तरि कृतज्ञता हरि! तुझ्याच ठायीं अगा, सख्या! अणुचि मानिसी करुनि सुप्रसादा अगा। भुले सुकविवाग्वधू तव गुणा**

**अनर्घ्या नगा, ह्मणेल जन कोण**
**कीं यश पुनःपुन्हां तें नगा ॥९९॥**

भगवंताची कृतज्ञता वर्णीत होत्साता कवि ह्मणतो. अशी तरि कृतज्ञता हरि तुझ्याच ठायीं. हे हरि ! अशी कृतज्ञता ह्म० मागल्या श्लोकांत सांगितल्या प्रकारची कृतज्ञता तर तुझ्याच ठायीं आहे; इतरांचे ठायीं नाहीं. कां कीं, अगा सख्या अणुचि मानिसी करुनि सुप्रसाद। अगा. अगा सख्या ह्म० अगा प्राणप्रिया देवा ! भक्तांचें अणुमात्र कृत्य पर्वताएवढें मानतोस आणि आपण भक्तांवर अगा ह्म० पर्वतप्राय सुप्रसादा करून अणुच मानतोस ह्म० फारच थोडा केला असं मानतोस. तर हें महाकृतज्ञाचें लक्षण होय. ह्मणून, भुले सुक-विवाग्वधू तव गुणा अनर्घ्या, यामुळेंच सुकवींची वाणी हीच कोणी वधू ह्म० उपवर कन्या ती तुझ्या अनर्घ्या गुणा नगा भुले ह्म० अमूल्य जे तुझे कृतज्ञत्वादि गुण हेच नग ह्म० अलंकार यांला भुलते. असे अलं-कार ज्यापाशीं आहेत त्यालाच मी वरीन असं ह्मणते. मग, ह्मणेल जन कोण कीं यश पुनःपुन्हा तें न गा कोण कविजन असं ह्मणेल कीं, हें भगवंताचें यश पुन्हा पुन्हा गाऊं नका ? कोणी ह्मणणार नाहीं. सर्व कवि वारंवार गातलिच ॥ ९९ ॥

---

**तुह्मी बहु भले मला उमज हो-**
**य ऐसें कथा, कसा रसिक तो**

**पुन्हा जरि ह्मणेल आली कथा। प्रतिक्षण नवीच दे रुचि शुकाहि संन्यासिया, न मोहिति भवत्कथा अरसिका अधन्यासि या॥ १००॥**

कवींनीं पुनःपुन्हा तुमचें यश गाइलें असतां कितीएकांस आवडतें आणि कितीएकांस आवडत नाहीं, याविषयीं मी तुह्मांस विचारतों; कीं, तुह्मी बहु भले. ह्म० थोर दयाळु आहां. याजकरितां, मला उमज होय ऐसें कथा. माझी समजूत पडेल असें सांगा. मी एवढेंच विचारतों कीं, कसा रसिक तो पुन्हा जरि ह्मणेल आली कथा. जी कथा मी एकवेळ ऐकिली होती तीच पुन्हा आली कीं; ही मला ऐकावयास नको, असें जो ह्मणेल तो रसिक कसा ह्म० त्याला रसिक कसें ह्मणावें ! तोच अरसिक होय, कीं, जो रसज्ञ असतो तो पुनःपुन्हा रस घेण्यास कंटाळत नाहीं. पाहा, शुकस्वामी केवढा रसज्ञ तो ! प्रतिक्षण नवीच दे रुचि शुकाहि संन्यासिया. सर्वसंगपरित्याग करून संन्यासी झाला अशा शुकालाही तुमची कथा प्रतिक्षणीं नवी नवी रुचि देती झाली. त्या रुचीनें त्यानें भगवद्यश पुनःपुन्हा गात असावें. यावरून जे रसिक आहेत त्यांला तुमच्या कथा मोहित करतात. पण, न मोहिति भवत्कथा अरसिका अधन्यासि या. मजसारख्या अधन्य ह्म० दुर्दैवी, अरसिक ह्म० कथारसाचा अभिज्ञ नव्हे, अशाला भवत्कथा मोहीत नाहींत. लोकांची निंदा होईल ह्मणून

अरसिकत्व आणि अधन्यत्व कवीनें आपणाकडे घेतलें. वस्तुतः तो रसिकच होता ॥ १०० ॥

---

**कथा श्रवणचत्वरीं जरि पुनः पुन्हा ये रते, महारसिक तद्रसीं विटति ऐकतां येर ते। विलोकुनि विलासिनीजन पुनःपुन्हा कामुका, करी वश नव्हे बुळा विवश घेइना का मुका ॥ १०१ ॥**

मागच्या श्लोकांत वर्णिलेला अर्थ पुनः दृष्टांतेंकरून दृढ करीत होत्साता कवि ह्मणतो. कथा श्रवणचत्वरीं जरि पुनःपुन्हा ये. भगवत्कथा ही नटीसारखी जरी वारंवार श्रवणचत्वरीं ह्म० कर्णरूप अंगणामध्यें नृत्य करावयास आली: तरी, रते महारसिक तद्रसीं. महारसिक ह्म० मोठा रसज्ञ आहे तोच तिच्या प्रेमरसांत रममाण होतो. आणि, विटति ऐकतां येर ते. येर ह्म० अन्य, अर्थात् अरसिक असतात ते मात्र विटतात ह्म० कंटाळतात. त्यांचें चित्त त्या रसांत रत होत नाहीं. यास दृष्टांत.–विलोकुनि विलासिनी जन पुनःपुन्हा कामुका करी वश. विलासिनिजन ह्म० ज्या वेश्या स्त्रिया असतात त्या कामुका ह्म० शृंगाररसज्ञ पुरुषाला पुनःपुन्हा विलोकून ह्म० नुसत्या पाहण्यानेंच वश करितात. कां कीं, तो रसिक असतो ह्मणून. परंतु, नव्हे बुळा विवश

घेइना का मुका. जो बुळा ह्म० नपुंसक असतो तो वश नव्हे ह्म० तो वश होत नाहीं. विवश ह्म० निःशंकपणें तो विलासिनीजन त्याचा मुका कां घेईना ? तरी तो नपुंसक त्या शृंगारचेष्टांकडे पाहत देखील नाहीं. कारण कीं तो अरसिक पडला ॥ १०१ ॥

---

**कथा सुपुरुषा तुझी वश तशी**
**करी राधिका, जशी तुज जिला**
**स्वयें ह्मणसि तूं शरीराधिका ।**
**तिचें न घडतां रमाहृदयवल्लभा!**
**सेवन प्रभो! तुज जसें तसें मति-**
**स गेह भासे वन ॥ १०२ ॥**

भगवत्कथा रसिकाला वश करिते असें जें मागल्या श्लोकांत सांगितलें तेंच दृष्टांतें करून कवि दृढ करितो कथा सुपुरुषा तुझी वश तशी करी. हे भगवन्! तुझी कथा सुपुरुषा ह्म० रसिक आणि धन्य अशा पुरुषाला तशी वश करिते ह्म० आपल्या नादीं लावून घेते. तशी कशी ? तर, राधिका जशी तुज. कृष्णावतारीं तुह्मी गोकुळांत क्रीडार्थ वास करीत असतां एका गवळ्याची मुलगी राधिका ह्म० राधा नांवाची होती ती जशी तुह्मांला वश करिती झाली तशी. ती राधिका कोणती ह्मणाल तर सांगतों. जिला स्वयें ह्मणसि तूं शरिराधिका. ज्या गोपकन्यकेला तुह्मी आपल्या शरीरापेक्षांही अधि-

क प्रिय मानीत होतां ती. तुह्मला तिनें इतकें मोहून टाकिलें होतें कीं, तिचें न घडतां रमाहृदयवल्लभा सेवन. हे रमाहृदयवल्लभा ह्म० हे लक्ष्मीप्राणप्रिया! तिचें ह्म० त्या राधिकेचें सेवन ह्म० तिची गांठ पडून तिशीं हास्य विनोदादिक कृत्य जर एकादे दिवशीं न घडलें तर, प्रभो तुज जसं तसें मतिस गेह भासे वन. तुह्मांला आपलें घर जसें अरण्यतुल्य भासत असे, तसेंच ज्या पुरुषाला कथेनें वश केलें त्याला जर एकादे दिवशीं कथाप्रसंग न घडला तर त्याच्या मतिला ह्म० बुद्धीला आपलें घर अरण्यासारखें वाटतें. गृहादिकांपासून त्याला सुख होत नाहीं; अशी तुझी कथा मोठी मोहक आहे हें तात्पर्य ॥ १०२ ॥

---

**कथा भुवनमोहिनी अशि न मो-**
**हिनी होय ती, हरो असुरधी**
**हिणें भुलविले किती हो! यती।**
**नव्हे न ह्मणवे असो जरि विमो-**
**हिला दक्षहा, प्रिया बसविली**
**शिरीं मुनिपथीं कसा दक्ष हा १०३**

भगवत्कथेचा मोहकपणा विशेषें करून वर्णीत होत्साता कवि ह्मणतो. कथा भुवनमोहिनी. महाराज! तुमची कथा भुवनमोहिनी ह्म० त्रिभुवनाला मोह करणारी आहे. ह्म० तुमच्या कथेनें मोहित झालेले भक्त

तीन्ही लोकांत आहेत असें तात्पर्य. अशि न मोहिनी होय ती. ती प्रसिद्ध मोहिनी ह्म० समुद्रमंथनप्रसंगीं जें तुह्मीं मोहिनी रूप घेतलें होतें ती, अशी नाहीं, ह्म० कथेसारखी मोहक नाहीं. तिनें दैत्यांला मोह केला नव्हता काय ? असें ह्मणाल तर, हरी असुरधी. ती मोहिनी दैत्यांची बुद्धि हरो; त्यांत कांहीं विशेष नाहीं. ते दैत्य तमोगुणी होते ह्मणून त्यांची बुद्धि तिनें मोहित केली असेल तर असो; पण, हिणें भुलविले किती हो यती. अहो महाराज! हिणें ह्म० ह्या कथेनें कितीएक यति भुलविले ! यति शब्दानें संन्यासी, योगी, तपस्वी मुनि इत्यादि सात्विक भक्त समजावे. तुह्मी ह्मणाल कीं त्या मोहिनीनें मोठा एक योगी भुलविला होता. तर, नव्हे न ह्मणवे. माझ्यानें नाहीं ह्मणवत नाहीं. असो, जरि विमोहिला दक्षहा. दक्षहा ह्म० दक्षप्रजापतीचा यज्ञ विध्वंस करणारा महादेव हा तिणें भुलविला खरा, असें जरी ह्मणतां तरि तोही तमोगुणीच होता. पहा, प्रिया बसविली शिरीं मुनिपथीं कसा दक्ष हा. मी असें विचारतों ज्यानें बायको डोक्यावर बसविली, अर्थात् स्त्रीजित असा हा महादेव मुनिमार्गांत दक्ष ह्म० ऋषिमार्गानें चालण्याविषयीं समर्थ असा कसा ह्मणावा ? तो यति नव्हे. त्याला भुलविलें यांत कांहीं विशेष नाहीं हें तात्पर्य ॥ १०२ ॥

---

# सुरासुरनरोरगां भुलवुनी कथा न त्यजी, न भेद करि पंक्तिचा

**अमृत पाजिती सत्य जी। तिणें जरि सुधारस स्वरतमानसां पाजिला, वधी अमृत घोटितां द्रव न येचि बापा जिला ॥ १०४ ॥**

त्या मोहिनीपेक्षांही कथेच्या अंगीं गुण अधिक आहेत असें दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. सुरासुर नरोरगां भुलवुनी कथा न त्यजी. सुर ह्म० देव, असुर–दैत्य, नर–मनुष्य, आणि उरग–सर्प यांला कथा भुलविते; पण त्यांचा त्याग करीत नाहीं. आणि ती मोहिनी ज्यांला भुलविते त्यांचा त्याग करिते; आणखी, न भेद करि पंक्तिचा. ही कथा पंक्तिभेद करीत नाहीं ह्म० एकाला चांगला एकाला वाईट असा रस वाढीत नाहीं, तर सर्वांस सारखा देते; आणि ती मोहिनी तर पंक्तिभेद करणारी आहे. परंतु, अमृत पाजिती सत्य जी. जी कथा सत्य अमृत–खरं अमृत ह्म० मोक्षरस पाजिते; कोणाला ठकवीत नाहीं. आणि ती मोहिनी अमृत दाखवून मद्य पाजिते. तुह्मी ह्मणाल कीं, त्या मोहिनीनें अमृत पाजिलें नाहीं काय ? खरं, तिणें जरि सुधारस स्वरतमानसां पाजिला. त्या मोहिनीनें स्वरतमानसां ह्म० ज्यांचें मानस आपल्याठायीं रत झालें असे जे देव आणि दैत्य त्यांस सुधारस ह्म० अमृतरस जरी पाजिला, तरी त्यांस ह्म० देवांस मात्र प्राप्त झाला, असुरांस ठकविलें. त्या असुरांपैकीं एक असुर देवांच्या पंक्तींत बसून अमृत हातावर पडतांच तोंडांत घालिता झाला. पण, वधी अमृत

घोटितां. तो अमृत घोटितां ह्म० गिळीत असतां ती त्याचा शिरश्छेद करिती झाली. परंतु, द्रव न येचि बापा जिला. ज्या मोहिनीला त्याची दया आली नाहीं. अशी निष्ठुरत्हृदयाची ती होय, आणि ही कथा असा विश्वासघात कोणाचाही करीत नाहीं ॥ १०४ ॥

---

**अभीष्ट वरितात ते तव कथेसि विश्वासती, भली असुरवंचनी श्रुत असेचि विश्वास ती। कथा कशि सखी तिची ठकवुनी हरी संचितें, तरी अमृत दे असें सदय दाखवी वंचितें ॥ १०५ ॥**

मोहिनीपेक्षां कथेची आणखी विशेष योग्यता आहे असें दाखवीत होत्साता कवि ह्मणतो. अभीष्ट वरितात ते तव कथेसि विश्वासती. तुझ्या कथेवर जे विश्वास ठेवितात ते अभीष्ट वरतात ह्म० इष्टफलें पावतात. आणि ती मोहिनी तर, भली असुरवंचनी श्रुत असेचि विश्वासती ती. मोहिनी असुरवंचनी ह्म० दैत्यांस ठकविणारी पक्की आहे असें सर्व विश्वास ह्म० लोकांस ठाऊक आहे. तेव्हां कथा कशि सखी तिची. त्या मोहिनीची ही कथा सोबतीण कशी ह्मणावी? तर तिजपेक्षां श्रेष्ठच ह्मटली पाहिजे. आतां ही कथा ठकविते, पण कशी? ठकवुनी हरी संचितें तरी अमृत दे. ही कथा ठकवुन संचितें ह्म० संचित कर्में

हरितें खरी; पण अमृत ह्म० मोक्ष देतें. त्या मोहिनीनें असुरांचीं संचितें ह्म० संचित धनें घेतलीं, पण अमृत दिलें नाहीं. असें सदय दाखवी वंचितें. जो सदय असतो तो ठकविण्यानेंही असें हित करून दाखवितो. अशाला वंचक ह्मणूं नये ॥ १०५ ॥

---

**करा श्रवण येवढें अपटु लोक हांसो मला, अहो जरि गिळावया प्रियकुमार घे सोमला। तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी, तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय जी ॥ १०६ ॥**

जो दुसऱ्यास ठकवितो त्याला सदय कसें ह्मणावें असें जर ह्मणाल तर, करा श्रवण येवढं. मी बोलतों येवढं श्रवण करा, आणि मग माझ्या बोलण्यास दोष द्या; अपटु लोक हांसो मला. मी वंचकास सदय ह्मणतों ह्मणून अडाणी जन मला हंसेल तर हंसो; पण समंजस लोक कोणी हंसणार नाहींत. कारण, अहो जरि गिळावया प्रियकुमार घे सोमला. पहा, कोण्या बाईच्या आवडत्या मुलानें सोमलाचा खडा गिळावयाकारितां हातीं घेतला. मुलास ठाऊक नाहीं कीं, हें विष आहे; पण हें बाईनें पाहिलें आणि तिला ठाऊक कीं, हा सोमल खाईल तर मुलगा मरेल. ह्मणून,

तयासि टकवूनि दे बहुत शर्करा माय जी. त्या मुलाला, टकवून तो सोमलाचा खडा त्याच्या हातांतून घेऊन त्याला बहुत साखरेचे खडे देणारी जी माय ह्म० त्या मुलाची आई, तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय जी. जी महाराज ! स्वशिशुवंचनें ह्म० आपल्या मुलाला टकविल्यानें त्या आईला अदयता हा दोष स्पर्श करील काय ह्म० तिला निर्दय ह्मणावें काय सांगा बरें ? तशी तुझी कथा जनाला टकवून त्यांचीं घातक जीं संचित कर्मे तीं हरून त्यांला उत्तम गति देते, तिला अदय कोण ह्मणेल. सदयाचें टकविणें असेंच हितकारक असतें ॥ १०६ ॥

---

**ह्मणोनि बहु मोहिनीहुनि भली कथा हे तुजी, अभीष्ट फलद्याव-या नतमनोरथा हेतु जी । ह्मणा-ल जरि मीच त्या विषम काय दोघींत रे, जसा जन सितासिताभिधनदीसदोघीं तरे ॥ १०७ ॥**

मोहिनीपेक्षां कथा अधिक आहे असें जें मागील चार श्लोकांत वर्णिलें त्याचा उपसंहार करीत होत्साता कवि ह्मणतो. ह्मणोनि बहु मोहिनिहुनि भली कथा हे तुजी. असें आहे ह्मणून तुजी ह्म० तुझी कथा मोहिनी-पेक्षां बहु भली ह्म० फार चांगली. कां कीं, अभीष्ट फल

द्यावया नतमनोरथा हेतु जी. जी कथा नतांच्या ह्म० शरणागतांच्या मनोरथास इष्टफल द्यावयास हेतु ह्म० कारण अशी आहे. ह्मणजे भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारी आहे. कदाचित्, ह्मणाल जरि मीच त्या विषम काय दोघींत रे. जर तुह्मी ह्मणाल, त्या ह्मणजे कथा आणि मोहिनी ह्या दोघी मीच आहें ह्म० मत्स्वरूपच आहेत. मग दोघींमध्यें विषमभाव कशाचा काढतोस? तर त्या दोघींत कांहीं भेद नाहीं, यास दृष्टांत.— जसा जन सितासिताऽभिधनदीसदोघीं तरे. सिता ह्म० गंगा आणि असिता ह्म० यमुना या नांवांच्या ज्या पवित्र नद्या त्यांच्या सदोघीं ह्म० उत्तम प्रवाहांत स्नानापासून सारखाच तरतो. गंगा आणि यमुना ह्या दोन्ही मत्स्वरूपच आहेत आणि जनाला फलप्राप्ति दोघींपासून सारखीच आहे ह्मणून त्यांजमध्यें जसा भेद नाहीं तसा कथा आणि मोहिनी यांजमध्यें भेद नाहीं ॥ १०७ ॥

---

**अहा बहु विशुद्ध हे प्रभु तव स्वरूपाहुनी, न भिन्नतनु त्या भले भजति एकता पाहुनी। परंतु वदतों जनानुभव नातळो पाप गा! तशी न यमुना गमे जशि गमे निलिंपापगा ॥ १०८ ॥**

गंगा व यमुना यांचा दृष्टांत देऊन कथा आणि मोहिनी यांत भेद नाहीं असें तुह्मीं ह्मणतां तर ह्मणा; पण मी ह्मणणार नाहीं अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. अहा बहु विशुद्ध हे प्रभु तव स्वरूपाहुनी. अहा! काय सांगावें! हे प्रभु तव स्वरूपाहुनी ह्म० तुझें स्वरूप जी मोहिनी तिजपेक्षां हे ह्म० ही कथा बहु विशुद्ध ह्म० फार निर्दोष आहे. न भिन्नतनु त्या. त्या ह्म० गंगा यमुना भिन्नतनु नाहींत ह्म० स्वद्रूपच आहेत. तर, भले भजति एकता पाहुनी. तुझी आणि त्यांची एकरूपता आहे असें पाहून भले ह्म० साधुपुरुष त्या दोघींलाही भजतात खरे, मी नाहीं ह्मणत नाहीं; परंतु वदतों जनानुभव. परंतु मी लोकांचा अनुभव सांगतों. नातळो पापगा. अगा देवा! यामुळें मला पाप मात्र न लागावें. कोणता जनानुभव? तशी न यमुना गमे जशि गमे निर्लिपापगा. लोकांला यमुना तशी आवडत नाहीं. जशी निर्लिपापगा ह्म० देवनदी अर्थात् गंगा आवडते. ह्याच गंगा यमुना यांजमध्यें भेद आहे. ह्मणून यमुनेपेक्षां गंगा चांगली. तशी मोहिनीपेक्षां कथा चांगली असें मी ह्मणतों ॥ १०८ ॥

---

सद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें, तिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें। प्रजा हरिहरा अशा यदुदरीं अनेका कवी,

## भिऊनि ह्मणतील कां जशि सुधा तशी काकवी ॥ १०९ ॥

महाराज ! गंगेची योग्यता काय सांगावी ? जगद्गुरु-महेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें. त्रैलोक्याचा गुरु श्रेष्ठ जो महेश्वर प्रभु ह्म० महादेव त्याच्या मस्तकावर जिचें राहणें. एवढा मोटा महादेव पण त्याणेंही आपल्या मस्तकावर तिला धरिली. अशी गंगेची योग्यता. आणि स्वरूप पाहिलं तर, जिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें. जिच्या जळाच्या मळाशीं ह्म० वरच्या फेंसाशीं शरदृतूंतल्या चंद्राचें चांदणें तुळत नाहीं. शरत्कालीं चांदणें फार शुभ्र असतें, तें मळाची बरोबरी करीत नाहीं. मग जळाची कोठून ? इतकें जिचें स्वच्छ स्वरूप. आणखी, प्रजा हरिहरा अशा यदुदरीं अनेका. जिच्या उदरापासून हरिरूप ह्म० विष्णुरूप किंवा हररूप ह्म० शिवरूप अशा प्रकारच्या अनेक प्रजा ह्म० संतति निर्माण होतात. जे प्राणी गंगेत देह टाकितात ते विष्णुरूप किंवा शिवरूप होतात असें गंगेच्या माहात्म्यांत वर्णिलें आहे. असा महिमा यमुनेचा कोठें आहे ? तर गंगेसारखी यमुना कशी ह्मणावी ? मग कवी भिऊनि ह्मणतील कां जशि सुधा तशी काकवी. राजाला काकवी आवडते ह्मणून त्याच्या भयानें स्पष्टवक्ते कवि जशी सुधा तशीच काकवी असें कां ह्मणतील ह्मणणार नाहींत. सारांश काकवीसारखी यमुना आणि यमुनेसारखी मोहिनी ह्म० फारच काळी आणि सुधेसारखी गंगा आणि गंगेसारखी कथा ह्म० फारच स्वच्छ आहे ॥ १०९ ॥

तुला स्वयमुनेसवें कुवलयद्युति-
श्यामला ! ह्मणाल जरि मोहि-
नी निजतनू अवश्या मला। तु-
लीन अमृतोदधिप्रभवपुंडरीका-
मला, कथा सुरधुनीसवें सुजन
जींतविश्रामला ॥ ॥११० ॥

या गोष्टींत तुमचा माझा विभाग करूं तो असा कीं, मोहिनी आणि यमुना तुह्मीं आपणाकडे घ्या; आणि कथा व गंगा ह्या मजकडे द्या. मग आपण बरोबरी पाहूं, अशा अभिप्रायानें कवि ह्मणतो. तुला स्वयमुनेसवें कुवलयद्युतिश्यामला ह्मणाल जरि मोहिनी निजतनु. कुवलय ह्म० नीलकमल त्याची द्युति ह्म० कांति त्यासारखा श्यामल ह्म० नीलवर्ण अशा हे देवा! मोहिनी निजतनू ह्म० ती माझेंच शरीर आहे असें जर ह्मणाल तर, अवश्या मला. मला ती अवश्या आहे, ह्म० तुमचीच तनू असें मलाही ह्मणावयाचेंच आहे. ज्यापक्षीं मोहिनी तुमची तनू त्यापक्षीं तीही नीलवर्णच असेल. ती तुह्मीं यमुनेसवें तुला ह्म० यमुनेशीं तिची बरोबरी करा. कां कीं, यमुना ही तुमची तनू आणि नीलवर्णही आहे. मग मी काय करिन कीं, तुलीन अमृतोदधिप्रभवपुंडरीकामला कथा सुरधुनीसवें. अमृतोदधि ह्म० सुधासमुद्र तो पांढरा, त्यापासून उत्पन्न झालेलें पुंडरीक ह्म० पांढरें कमळ

तें फारच पांढरें त्यासारखी अमल ह्म० अति शुभ्र अशी जी तुमची कथा ती सुरधुनीसवें ह्म० गंगेशीं तुलीन ह्म० तिची बरोबरी करीन. सुरधुनी कशी आहे? सुजन जींत विश्रामला. जींत सुजन ह्म० साधुजन विश्रामला ह्म० विश्रांति पावला; मग अर्थात् कथा पांढरी आणि मोहिनी काळी असें झाल्यावर मोहनीपेक्षां कथा चांगली असें तुह्मांसही वाटेल ॥ ११० ॥

---

**शुकोदित पुराण ज्या श्रवण सन्मुखें साग्रही, ह्मणेल अतुला कथा ह्मणि ह्मणाल तो आग्रही। न केवळ मलाचि हे निरुपमा यशोमंडिता, गुरूसहि गमे पुसा स्ववरदा महापंडिता ॥ १११ ॥**

कथेला गंगेची तुलना येते असें मी ह्मटलें खरें; पण वास्तविक पाहतां कथेला कशाचीच तुलना येत नाहीं, असें प्रतिपादित होत्साता कवि ह्मणतो. शुकोदित पुराण ज्या श्रवण सन्मुखें साग्रही. ज्या पुरुषाला शुकोदित पुराण ह्म० भागवत पुराण सन्मुखें ह्म० साधूच्या मुखानें श्रवण झालें तें थोडेंसें नाहीं तर, साग्रही ह्म० साद्यंत श्रवण झालें असेल. तो पुरुष, ह्मणेल अतुला कथा. भगवत्कथा अतुला ह्म० तुलनारहित असें ह्मणेलच. आतां ह्मणि ह्मणाल तो आग्रही. तो आग्रही आहे

असें तुह्मीं कदाचित् ह्मणाल हो; पण तो आग्रही नव्हे. तें पुराण मला सन्मुखानें समग्र श्रुत झालें आहे ह्मणून मीही तसेंच ह्मणतों असें तात्पर्य. न केवळ मलाचि हे निरुपमा यशोमंडिता गुरूसहि गमे. ही कथा मलाच केवळ निरुपमा आणि यशोमंडिता ह्म० कीर्तीनें शोभणारी अशी गमे ह्म० वाटते असें नाहीं, तर तुमचा गुरु जो सांदीपाने ऋषि त्यालाही तशीच वाटते. माझें बोलणें तुह्मांला खोटें वाटेल तर, पुसा स्ववरदा महापंडिता. तुह्मांस वर देणारा महापंडित असा जो तुमचा गुरु त्यालाच पुसा ह्म० विचारा. तो यथार्थ सांगेल कीं कथा निरुपमा आहे ॥ १११ ॥

---

**प्रभो! तुज न मोहिनी भुलवि मोहिला तोहि ती, त्यजी जन नव्हे तशी तुज तुझी कथा मोहिती। निजानुभव तूं पहा जशि महौषधी पारदा, तुला स्थिर बळें करी कळविलें तुवां नारदा ॥ ११२ ॥**

कवि ह्मणतो मोहिनीच्या अंगीं गुण कमी आणि कथेच्या आंगीं गुण अधिक याविषयीं आणखी एक गोष्ट तुह्मांला सांगावयाची राहिली ती सांगतो. प्रभो तुज न मोहिनी भुलवि. हे प्रभो! तुमची मोहिनी इतरांस भुलविते. पण तुह्मांला कधीं भुल-

वीत नाहीं, ह्मणजे ती तुह्माला भुलवूं शकत नाहीं, आणि मोहिला तोहि ती त्यजी जन. जो भुलवून मोहित केला जन त्याचा त्यागही करिते. नव्हे तशी तुज तुझी कथा मोहितो. तुमची कथा तुह्मांला मोहित करिते, आणि तशी नव्हे ह्म० मोहिताचा त्याग करणारी नव्हे. तुह्मांला मोहित करते कीं नाहीं याविषयीं, निजानुभव तूं पहा. ह्म० तुमचा अनुभव तुह्मीच पहा. आह्मीं बोलून दाखवावें असें नाहीं. जशि महौषधी पारदा तुला स्थिर बळें करी. कांहीं एक महौषधि जशी चंचल पाऱ्याला स्थिर करिते, तशी तुझी कथा तुला बळेंच स्थिर करिते, ह्म० जेथें तुझ्या कथेचा प्रसंग चालला असतो तेथून तुझ्यानें हालवत नाहीं. ही माझी कल्पना नव्हे. तर कळविलें तुवां नारदा. तुह्मींच नारदाला हें सांगितलें आहे ॥ ११२ ॥

---

**सुरर्षिजवळीं स्वयें वदसि तत्र तिष्ठामि या, तुझ्याचि वचनें ह्मणें तुज कथावश स्वामिया ! । जसा स्थिर कथेंत तूं स्थिर करीं तसें या मना, स्वभक्तसुरपादपा ! सफल हे असो कामना ॥ ११३ ॥**

मी नारदाला काय कळविलें असें तुह्मीं ह्मणाल तर सांगतों. सुरर्षिजवळि स्वयें वदसि तत्र तिष्ठामि तुह्मीं नार-

दाजवळ स्वत: बोलला कीं, तत्र तिष्ठामि. ह्म० " मद्भक्ता यत्र गायंति तत्र तिष्ठामि नारद! " ह्म० ज्या ठिकाणीं माझे भक्त माझी कथा गातात त्या ठिकाणीं मी उभा असतों. या तुझ्याचि वचनें ह्मणें तुज कथावश स्वामिया. हे स्वामिया ह्म० हे स्वामिन् प्रभो! या तुझ्याच वचनावरून तुझाला कथावश असें मी ह्मणतों तर आतां माझी दीनाची प्रार्थना इतकीच आहे कीं, जसा स्थिर कथेंत तूं स्थिर करीं तसें या मना. महाराज! आपण जसे आपल्या कथेंत स्थिर असतां तसेंच या माझ्या मनाला कथेंत स्थिर करा. त्यास विषयांकडे जाऊं देऊं नका. स्वभक्तसुरपादपा सफल हे असो कामना. हे स्वभक्तांच्या कल्पवृक्षा देवा! ही माझी कामना ह्म० इच्छा सफल असो. कल्पवृक्षाला भक्तांची इच्छा पूर्ण करणें कांहीं अवघड नाहीं ॥ ११३ ॥

---

**सुरर्षि ह्मणतो तुझें यशचि धन्य यो गायना, मला कवि ह्मणोत ते सुखद अन्ययोगायना। विमुक्ति बहु साधनें तदितरें गणीनाच तो, सजूनि वरवल्लकी तव सभांगणीं नाचतो ॥ ११४ ॥**

तुह्मीं आपल्या कथेला इतके वश आहां ह्मणून, सुरर्षि ह्मणतो, तुझें यशचि धन्य यो गायना मला. नारद ह्मणतो,

हे देवा ! धन्य जे तुझें यश ह्म० कीर्तितेंच गायना ह्म० तुझें यश गाणारा अशा मला यो ह्म० माझ्या गाण्यांत नेहमीं येवो. आणि कवि ह्मणोत ते सुखद अन्ययोगायना. ते कवि ह्म० ते प्रसिद्ध कवि वसिष्ठ, वामदेव, सनक इत्यादि ज्ञानी अन्य ह्म० भगवद्गुणकीर्तनाहून इतर जो योगमार्ग तो सुखद ह्म० आनंद देणारा आहे असे ह्मणत असतील तर ह्मणोत, परंतु मी ह्मणत नाहीं. ह्मणून, विमुक्ति बहु साधनें तदितरें गणीनाच तो. तो नारद तदितरें ह्म० कीर्तनाहून इतर ह्म० दुसरीं जीं मुक्तीविषयीं बहुत साधनें आहेत तीं गणीत नाहीं, अर्थात् तुच्छ मानितो. आणि, सजूनि वरवल्लकी तव सभांगणीं नाचतो आणि श्रेष्ठ जी ब्रह्मवीणा ती सजवून ह्म० हातांत घेऊन बोटानें वाजवीत आणि मुखानें तुमचें यश गात तव सभांगणीं ह्म० तुमच्या मंदिरापुढें नाचतो ह्म० आनंदानें नृत्य करतो. याचा मुख्य हेतु इतकाच कीं, मी भगवत्कथा गात असलों ह्मणजे भगवान् लवकर येईल, उभा राहील, आणि मला दर्शन देईल ॥ ११४ ॥

---

**तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें यास्तव, प्रजापतिसुतत्व ये करिति साधु ज्याचा स्तव । स्वनीचपण मागिलें बहु दया अशी नारदा, स्मरे घडिघडि प्रभो! भवपयोधिच्या पारदा! ॥ ११५ ॥**

नारदाला तरी तुमच्या कथाकीर्तनाची इतकी गोडी लागण्यास कारण मुख्यत्वें तुमची दया असें दर्शवीत होत्साता कवि ह्मणतो. तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें. महाराज! हा नारद पूर्वजन्मीं एका शूद्रीचा पुत्र होता. ती शूद्री साधूंच्या आश्रमांत सेवा करावयास राहिली होती. तिच्या समागमें हाही साधूंची सेवा करीत असे. जेव्हां ते साधु आपापणांत भगवंताचें चरित्र वर्णीत, तेव्हां हा जवळ असल्यामुळें याच्या कानीं तें सहज पडत असे. अशा रीतीनें तुमचें चरित्र साधुमुखानें त्याला श्रुत झालें. यास्तव प्रजापतिसुतत्व ये. ह्या पुण्यामुळें त्याला जन्मांतरीं ब्रह्मदेवाचें सुतत्व ह्म० पुत्रत्व प्राप्त झालें. तो ब्रह्मदेवाचा पुत्र झाल्यामुळें, करिति साधु ज्याचा स्तव. ज्या नारदाचा मोठमोठे साधु स्तव करूं लागले व तो साधुमाळेचा मेरुमणीच केवळ असा झाला; इतकी योग्यता त्याला आली. आणखी स्वनीचपण मागिलें बहुदया अशी नारदा स्मरे घडिघडि प्रभो भवपयोधिच्या पारदा. हे संसारसमुद्राच्या पार नेणाऱ्या देवा! तुमच्या कृपेनें त्याला पूर्वजन्मींचें स्मरण राहिलें होतें ह्मणून मागल्या जन्मींचें आपलें नीचपण ह्म० दासीपुत्रत्व, आणि त्यावर अशी भगवंताची दया, असें त्या नारदाला घडोघडीं आठवतें. तुमचे उपकार तो विसरला नाहीं ॥ ११५ ॥

---

**तुझें यशचि तारितें परि न केवळा तारवे, सहाय असिला असे**

**तरिच शत्रुला मारवे । न भागवत भेटतां न घडतांहि सत्संगती, न अज्ञह्रदयें तशीं तव यशोरसीं रंगती ॥ ११६ ॥**

संसारसमुद्राला नारद तरला याला मुख्यत्वें साधुसमागम कारण असें दर्शवीत होत्साता कवि ह्मणतो. तुझें यशचि तारितें पार न केवळा तारवे, महाराज! जीवाला तुमचें यशच तारतें हें खरें आहे. नारदाला तुमच्या यशानेंच तारलें, परंतु केवळ ह्म० नुसत्या असहाय यशाच्यानें तारवत नाहीं. याला दृष्टांत-सहाय असिला असे तरिच शत्रुला मारवे. खड्गाला जर शूराचा हात असला तरच त्याच्यानें शत्रूला मारवतें. एकटें शस्त्र जाऊन शत्रूचा गळा कापीत नाहीं तसें तुमच्या यशाला साधूंचें सहाय पाहिजे. नारदाला साधूंचा समागम झाला ह्मणून तुमच्या यशाची गोडी त्याला लागली, आणि त्या यशानें त्याला तारलें, परंतु न भागवत भेटतां. ह्म० भगवद्भक्तांची गांठ घडल्यावांचून, आणि न घडतांहि सत्संगती. साधूंचा निरंतर समागम घडल्यावांचून, न अज्ञह्रदयें तशीं तव यशोरसीं रंगती. अज्ञान मनुष्यांचीं ह्रदयें ह्म० अंतःकरणें तुमच्या यशोरूप रंगांत तशीं रंगत नाहींत. ह्म० उत्तम प्रकारें तन्मय होत नाहींत. अर्थात् साधूंच्या संगतीनें भगवद्यशाची गोडी लागते, तेव्हां तें यश तारितें असा भाव ॥ ११६ ॥

---

**बुडे बुडवि सागरीं तरि सुकर्ण-धाराविना, सहाय नसतां स्वयें परतटासि ती दाविना । सहाय भगवज्जनां तव सुकीर्ति जेव्हां करी, तईंच उतरी भवोदधितटीं जना लौकरी ॥ ११७ ॥**

भगवद्यशाला साधुजनाचें साह्य पाहिजे याविषयीं आणखी दृष्टांत देऊन दृढ करीत होसाता कवि ह्मणतो. बुडे बुडवि सागरीं तरि सुकर्णधाराविना. तरि ह्म० नौका ही सुकर्णधाराविना ह्म० तिला सुकाणूं धरणारा नावाड्या चांगला नसला तर सागरीं ह्म० समुद्रांत आपण बुडते आणि दुसऱ्यालाही बुडविते. उत्तम मात्रा रोग्याला तारते खरी, पण देणारा कुशल वैद्य पाहिजे. नाहीं तर मात्रा फुकट जाऊन कदाचित् रोग्याचाही नाश होतो. तसें, सहाय नसतां स्वयं परतटासि ती दाविना. नौकेला नावाडी सहाय नसला तर ती स्वतां परतीरास नेत नाहीं. आणि तसेंच, सहाय भगवज्जनां तव सुकीर्ति जेव्हां करी. तुमची उत्तम कीर्ति खरी, परंतु ती जेव्हां भगवज्जनांला सहाय करून घेते ह्म० आपणाला मदत करणारे करून घेते, तईंच उतरी भवोदधितटीं जना लौकरी. तेव्हांच जनाला भवसमुद्राच्या पार नेते. तुमची कीर्ति ही नौका आणि साधु हाच कर्णधार. त्याच्या साह्या-

नें लोकांला ती भवसागराच्या परतीरास लौकर पोंचविते. ह्मणून साधुसमागमाची योग्यता मोठी आहे हें तात्पर्य ॥ ११७ ॥

**सुसंगति सदा घडो सुजनवाक्य कानीं पडो, कलंक मतिचा झडो विषय सर्वथा नावडो। सदंघ्रिकमळीं दडो मुरडितां हटानें अडो, वियोग घडतां रडो मन भवच्चरित्रीं जडो ॥ ११८ ॥**

एवढा वेळपर्यंत बोलून मी देवाला कंटाळा आणला असेल तर आतां कांहीं वर मागून बोलणें पुरे करावें असें मनांत आणून कवि प्रार्थना करतो. साधुसमागमावांचून कार्यसिद्धि नाहीं असें मागील श्लोकांत वर्णिलें ह्मणून प्रथम तेंच मागतो. सुसंगति सदा घडो. हे दयासागरा देवा! आतां इतकें तरी करा कीं, निरंतर सुसंगति ह्म० उत्तम संगति; अर्थात् साधुसमागम मला घडावा. दुर्जनांचा समागम नको; सुजनवाक्य कानीं पडो. सुजनांचें भाषण माझ्या कानीं पडावें. तेणेंकरून, कलंक मतिचा झडो. बुद्धीला जो पातकाचा मळ लागला असेल तो सर्व झडून जाऊन बुद्धि निर्मळ व्हावी. विषय सर्वथा नावडो. बुद्धीला मळविणारे जे विषय ते सर्वथा आवडूं नयेत.

आणि हें माझें मन, सदंघ्रिकमळीं दडो. साधूंच्या चरणकमळीं भ्रमरासारखें लीन व्हावें. मुरडितां हटानें अडो. तेथून जर कोणी त्या मनाला काढूं लागलें तर त्यानें हट्ट धरून तेथेंच अडून बसावें. वियोग घडतां रडो. जबरीनें कोणी तेथून काढल्यामुळें वियोग घडला असतां त्यानें रडावें ह्म० दुःखित व्हावें. मन भवच्चरित्रीं जडो. साधुसमागमाच्या योगानें तुमच्या चरित्रांत ह्म० यशांत मनानें आसक्त होऊन राहावें असें करा ॥ ११८ ॥

---

**न निश्चय कधीं ढळो कुजनविघ्नबाधा टळो, न चित्त भजनीं चळो मति सदुक्तमार्गीं वळो । स्वतत्त्व ह्रदया कळो दुरभिमान सारा गळो, पुन्हा न मन हें मळो दुरित आत्मबोधें जळो ॥११९॥**

कवि आणखी मागतो. न निश्चय कधीं ढळो. साधूंच्या वचनावर जो एकवेळ निश्चय ठेविला तो कधीं ढळूं नये. कुजनविघ्नबाधा टळो. सत्कर्मास कुजन ह्म० दुर्जन विघ्न करतात तर त्यांची बाधा ह्म० पीडा टळावी ह्म० होऊं नये. न चित्त भजनीं चळो. ईश्वरभजनाकडे लावलेलें चित्त विषयलोभास्तव तेथून चळूं नये. मति सदुक्तमार्गीं वळो. साधूंनीं उपदे-

शिकेल्या मार्गाकडेसच मतीनें वळावें. दुसऱ्या मार्गानें जाऊं नये. स्वतत्त्व हृदया कळो. मी कोण व माझें कर्त्तव्य कर्म कोणतें हें तत्त्व ह्म० रहस्य हृदयाला कळावें. दुरभिमान सारा गळो. हा देहाभिमान आणि तन्मूलक विषयाभिमान सारा गळून पडावा ह्म० अहंता आणि ममता सर्वथा नसावी. पुन्हा न मन हें मळो. असें शुद्ध झालेलें मन अहंममतामळानें पुन्हा मळूं नये. आणि दुरित आत्मबोधें जळो. आत्मबोध ह्म० ब्रह्मज्ञान हाच अग्नि तो प्राप्त होऊन त्याच्या योगानें जन्ममरणास कारण जें दुरित ह्म० पातक किंवा तसें संचित कर्म तें तृणासारिखें जळून जावें असें करा ॥ ११९ ॥

---

**मुखीं हरि! वसो तुझी कुशलधामनामावली, क्षणांत पुरवील जी सकल कामना मावली । कृपा करिशि तूं जगत्त्रयनिवास! दासांवरी, तशी प्रकट हे निजाश्रितजना सदा सांवरी ॥१२०॥**

कवि ह्मणतो आतां मी शेवटला आशीर्वाद मागतों येवढा तरी कृपा करून द्या. तुमच्या पाददर्शनाचा लाभ प्रस्तुत माझ्या दैवीं नसेल तर, मुखीं हरि वसो तुझी कुशलधामनामावली. हे हरि ! कुशलधाम ह्म०

सर्व कल्याणाचें स्थान अशी जी तुझी नामावलि ( विष्णुसहस्रनामावली ) ती माझ्या मुखांत नेहेमीं राहूंद्या. क्षणांत पुरवील जी सकल कामना मावली. जी मावली ह्म० आई माझ्या लेंकराच्या सकल कामना ह्म० सर्व इच्छा क्षणांत ह्म० उशीर न लावितां पुरवील—पूर्ण करील. कृपा करिशि तूं जगत्त्रयनिवास दासांवरी. जगत्त्रयास व्यापून राहिलेला असा तूं दासांवर ह्म० भक्तजनांवर जशी कृपा करतोस, तशी प्रकट हे निजाश्रित जना सदा सांवरी. तशी ही तुझी नामावलि निजाश्रित जनांस ह्म० आपल्या आश्रित जनांस ह्म० नामधारकांस निरंतर सांवरिते ह्म० सांभाळिते ह्म० पडूं देत नाहीं. अर्थात् अधोगतीस जाऊं देत नाहीं हें प्रसिद्ध आहे. ह्मणून ती नामावलि माझ्या मुखीं सर्वदा राहील असें करा, असें मी मागतों ॥ १२० ॥

---

**दयामृतघना ! अहो हरि वळा मयूराकडे, रडे शिशु तयास घे कळवळोनि माता कडे । असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ! कदा सांपडे, तुह्मां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे ॥ १२१ ॥**

आतां आपल्या मयूर नामास उचित अशी दीनपणानें कवि प्रार्थना करितो. दयामृतघना अहो हरि

वळा मयूराकडे. अहो दयामृतघना हरि! तुह्मी दयारूप अमृतरसाची वृष्टि करणारे मेघ आहां ह्मणून मयूराकडे वळा, ह्म० हा मयूर कवि तापत्रयानें संतप्त होऊन तुमची वाट पाहतो याजकडे वळा ह्म० मुरडा आणि यावर दयामृताची वृष्टि करा. मेघावांचून मयूराला सुख देणारा कोण आहे ? मेघच देईल तर देईल. लोकांतही अशी रीति आहे कीं, रडे शिशु तयास घे कळवळोनि माता कडे. जें शिशु ह्म० लेंकरूं आईकडे पाहून दीनवाणीं रडतें त्या शिशूला त्याची माता कळवळोनि ह्म० त्याच्या दुःखानें दुःखित होऊन तत्क्षणीं उचलून कडेवर घेते. तसा मी लेंकरूं अनन्यगति आणि तुह्मी माता दयावती· मी रडत असतां माझा कळवळा तुह्मांस येऊं नये काय ? यावा हें योग्य आहे. असा अतिथि धार्मिकस्तुतपदा कदा सांपडे. अहो धार्मिकस्तुतपदा देवा ! मोठे मोठे धार्मिक तुमच्या पायांची स्तुति करितात. तुह्मांसारखा धार्मिक ह्म० याचकाचे मनोरथ पूर्ण करणारा कोणी नाहीं अशा तुह्मांला असा ह्म० मजसारखा दीन अतिथि ह्म० याचक कदा सांपडे ह्म० कधीं सांपडणार आहे ? असा याचक तुह्मांला बहुकाळानें सांपडला असतां तुह्मीं आपला धार्मिकपणा मजवर कां प्रकट करीत नाहीं ! करावा हेंच योग्य. तुह्मां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे. दासांला भवसमुद्रांतून पार पाडणें हें तुह्मांला कांहींच जड नाहीं; ही तुमची साहजिक लीला आहे ॥ १२१ ॥

---

कारुण्यांभोद राम प्रियसख गु-
रुही जो मयूरा नटाचा, होतां ता-
पत्रयार्त त्वरित भववनीं रक्षिता
रानटाचा । त्याचें साचें स्वभद्र
स्मरण मग न तें त्या कसें ये
कवीस, केका एका सख्यातें
स्मरुनि करि अशा एकशें एक-
वीस ॥ १२२ ॥

आतां कवि मयूर पंत हा आपली उपास्यदेवता. जो दाशरथि रामचंद्र त्याचें स्मरण करून ग्रंथ समाप्ति करतो. रानटाचा मयूरानटाचा प्रियसख आणि गुरुही असा आणि भववनीं तापत्रयार्त होतां त्याचा त्वरित रक्षिता असा जो कारुण्यांभोद राम त्याचें साचें स्वभद्र असें जें स्मरण ते त्या कवीस कसें नये ? ह्मणून एका सख्यातें स्मरुनि तो मयूर कवि एकशें एकवीस केका करी. कवीनें येथें रूपकालंकार केला आहे. मयूरकवि हाच मयूर ह्म० मयूर जसा रानट ह्म० रानांत राहणारा तसा कवि मयूर रानट ह्म० अज्ञान. मयूर नाचतो ह्मणून त्याला नट असें ह्मटलें. कवि मयूरही भगवद्गुणकीर्तन करतांना नाचतो. ह्मणून हाही नट [illegible] रामचंद्र हा कारुण्यांभोद ह्म० करुणारसाची [illegible]ारा मेघ होय. तो प्रसिद्ध मेघ

मयूराचा प्रियसख ह्म० फारच आवडता आणि गुरु ह्म० नृत्य करावयास शिकविणारा असतो. तसा राम मेघ हाही ह्या कविमयूराचा प्रियसख आणि गुरुही आहे. तो मयूर वनामध्यें उष्णानें संतप्त झाला असतां मेघ येऊन वृष्टीनें त्याचा ताप दूर करून त्याचें रक्षण करतो. तसा कवि मयूर भववनीं ह्म० संसाररूप अरण्यांत तापत्रयार्त होतां ह्म० आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक अशा त्रिविध तापानें पीडित झाला असतां कृपारूप रसाच्या वृष्टीनें त्याचें रक्षण करणारा राममेघ. अशा मेघाचें स्मरण मयूरास साचें स्वभद्र ह्म० खरें कल्याण करणारें. मग तें स्मरण त्या मयूरास किंवा या कविमयूरास कसें होणार नाहीं ? अर्थात् होईलच होईल. ह्मणून त्या मेघाचें स्मरण करून तो मयूरपक्षी जसा केका करतो ह्म० टाहो फोडतो, तसा हा मयूरकवि राममेघाचें स्मरण करून एकशें एकवीस केका ह्म० श्लोकरूप टाहो करिता झाला ॥ १२२ ॥

